श्री

# दुहिता

( स्फुट कविता - संग्रह )

लेखक

वि. ज. सहस्रबुद्धे, मिरज

( तात्याबुवा )

प्रस्तावनाकार

प्राध्यापक शंकर केशव कानेटकर, एम्. ए.

( कविवर्य गिरीश )

शके १८६८ )　　किंमत २ रुपये　　( सन १९४७

प्रमुख विक्रेते—
गोविंद वामन कुलकर्णी
महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर

मुद्रक—
लक्ष्मण नारायण चापेकर
आर्यसंस्कृति मुद्रणालय
१९८/१७ सदाशिव पेठ,
टिळक रस्ता, पुणे २

प्रकाशक—
नारायण तंमाजी कातगडे
प्रमुख
स्नेहसंवर्धक संघ, मिरज

रसिक वाचकवर्गाचे प्रतिनिधि

श्रीयुत ना. धों. ताम्हनकर

यांसी

स्नेह-भाव-पूर्वक अर्पण

# पाठवणी

माझ्या या कवितासंग्रहांतील बहुतेक सर्व कविता सह्याद्रि, किर्लोस्कर, मनोहर, चित्रमयजगत्, ध्रुव, विहंगम, केसरी, ज्ञानप्रकाश इत्यादि नियत-कालिकांतून पूर्वी प्रसिद्ध झालेल्याच आहेत. तरी त्या एकत्र स्वरूपांत पुनः प्रकाशित करून रसिक वाचकांच्या हातीं देतांना थोडी चिन्ता वा साशंकता मला वाटणें साहजिक आहे. कारण भिन्नरुचि व चिकित्सक वाचकांकडून शाबासकी मिळविणें, विशेषतः टीकाकारांच्या कठिण परीक्षेत चांगल्या तऱ्हेनें उत्तीर्ण होणें, अवघडच आहे. विवाहापूर्वी वधूची पसंती सासरच्या मंडळी-कडून झालेली असली तरी तिला सासरीं धाडतांना तिच्या पित्याला हुरहूर वाटल्याशिवाय रहात नाहीं, हा प्रापंचिक व्यवहारांतलाहि अनुभव आहेच. म्हणून या दुहितेच्या रूप-गुण-स्वभावासंबंधीं माहिती असणारी व तिच्या-बद्दल आपुलकी बाळगणारी 'पाठराखणी' सोबतीस देण्याचा विचार मीं ठरविला. तसें पाहिलें तर हें काम जितकें नाजूक तितकेंच जोखमीचें ! कारण, सासरच्या मंडळीची सहानुभूति मिळवून आपल्या भगिनीला मार्ग-दर्शन करण्याचें काम सोपें कसें म्हणतां येईल ! परंतु हें काम माझे श्रेष्ठ साहित्यिक स्नेही **कविवर्य गिरीश** यांनीं माझ्या विनंतीवरून आनंदानें स्वीकारून अगत्यपूर्वक केलें. यायोगें मी त्यांचा अत्यन्त ऋणी झालों आहें.

लेखकाच्या आशा-आकांक्षा, त्याच्या भावना व त्याचे विचार यांचें प्रतिबिंब त्याच्या लेखनांत पडल्याशिवाय रहात नाहीं. निराळ्या भाषेंत बोलाव-याचें झाल्यास पित्याचें स्वरूप व त्याचे गुणावगुण त्याच्या अपत्याच्या ठिकाणीं बहुधा दिसून येतात, याचेंच प्रत्यन्तर थोड्याबहुत प्रमाणांत या दुहिते-वरून वाचकांना मिळेल. "उदकान्तम् स्निग्धः जनः अनुगन्तव्यः" असा शिष्टाचार कन्येच्या पाठवणीच्या बाबतींत शार्ङ्गरवानें सांगून ठेवला असल्यानें याबाबत अधिक बोलणें इष्ट नाहीं. तो अतिक्रम होईल. तथापि इतर दोन तीन गोष्टींचा साभार उल्लेख करणें माझें कर्तव्य आहे.

नामवन्त साहित्यिक व विद्वान् प्राध्यापक **रामचंद्र श्रीपाद जोग**, एम्.ए , आणि अखिल महाराष्ट्राचे आवडते कवि व बडोद्याचे राजकवि श्रीयुत **यशवन्त दिनकर पेंढरकर**, या उभयतांशीं माझा विशेष परिचय किंवा स्नेहसंबंध नाहीं तरी त्यांनीं माझ्या विनंतीचा आदर करून आपले अभिप्राय दिले व मला उपकृत केलें आहे. हे अभिप्राय म्हणजे " शिवास्ते पंथानः सन्तु " म्हणून त्यांनीं दुहितेला दिलेले शुभ आशीर्वादच होत असें मी समजतों.

मित्रवर्य विनायकराव साठये व गुरुवर्य भट मास्तर यांनीं या कवितांचें परिष्करण करण्यासंबंधीं आणि श्रीयुत गोविंदराव खासगीवाले व श्रीयुत भय्यासाहेब शिराळकर यांनीं कविताची निवड करण्यासंबंधीं उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल या सर्वांचा मी आभारी आहें.

सुप्रसिद्ध लेखक श्री. **ना. धों. ताम्हनकर**, यांचा व माझा परिचय पंधरा सोळा वर्षांचा असून त्या परिचयाचें रूपान्तर स्नेहांत झालें आहे. माझ्या-वर त्यांचा लोभ आहे. माझ्या कविता अगत्यपूर्वक वाचून त्यांनीं मला वेळोवेळीं सहानुभूतिपूर्वक प्रोत्साहन दिलें असून ' रसिक वाचकवर्गाचे प्रतिनिधि ' अशा स्वरूपांत त्यांच्याकडे मी पाहतों. त्यांच्या ऋणांतून अंशतः उतराई होण्यासाठीं हें पुस्तक मी त्यांना अर्पण करीत आहें.

प्रुफें तपासतांना थोड्या चुका राहून गेल्याकारणानें जरूर तेवढें शुद्धि-पत्र यास जोडलें आहे.

शेवटीं, रसिक वाचकवर्गाला " न्यून तें पुरतें, अधिक तें सरतें, करून घेयावें " असें ज्ञानेश्वरांच्या वाणीनें विनवून इतक्या उशीरानें कां होईना, माझ्या या दुहितेची ही पाठवणी करून मी आज " प्रत्यर्पित न्यास इवान्तरात्मा " होतों आहें व यांतच माझें खरें समाधान सांठून राहिलें आहे.

नम्र

आश्विन शुद्ध प्रतिपदा
शके १८६८

वि. ज. सहस्रबुद्धे
( तात्याबुवा )

# प्रकाशकाचे दोन शब्द

अनेक अडचणींमुळें प्रस्तुत पुस्तक आजपावेतों प्रसिद्ध होऊं शकलें नाहीं. मुख्यतः युद्धजन्य परिस्थितीचीच अडचण होती. स्नेहसंवर्धक संघाचें हें आठवें प्रकाशन आहे.

'दुहिता' आपल्या स्वतःच्या हातून होणाऱ्या सेवेनेंच आपल्या गुण-दोषांचा परिचय वाचकांना करून देणार असल्यामुळें संघ तिच्या वतीनें कांहींच निवेदन करूं इच्छीत नाहीं.

प्रमुख विक्रेते श्रीयुत गोविंद वामन कुलकर्णी यांच्या मदतीबद्दल त्यांचे आम्ही आभार मानतों.

या पुस्तक-प्रकाशनाचे बाबतींत आणखीहि एका सद्गृहस्थांनीं विशेष प्रकारें मदत आम्हांस केली आहे. त्यांचा साभार नामनिर्देश करण्याचा परंतु त्यास त्यांची संमति नसल्यामुळें करतां आला नाहीं.

विजयादशमी
शके १८६८

पुंडलीकजी कातगडे
प्रमुख,
स्नेहसंवर्धक संघ, मिरज

# मध्यस्थी

श्री. सहस्रबुद्धे ह्यांच्या कवित्वशक्तीची ओळख करून द्यायला कोणाही तिऱ्हाइताची मध्यस्थी नको आहे.

'दुहिते'चें जीवनविषयक तत्त्वज्ञान कर्तव्याचें असून ती 'यत्नवादा'ची कास धरते, हें दाखविणारी 'सृष्टि कशी आहे' व 'कर्तव्याची उपेक्षा' हीं दोन सुनीतें आणि 'कल्पतरु' हें कवन अशा कविता वाचनीय आहेत. भविष्यकाळासंबंधीं 'हा कोण' हें सुनीत आणि 'भूतकाल'नामक कवन हीं हृद्य आहेत. वृत्ती जडे मनाची, झाकली मूठ, उदासवाणें गान, उणीव (शेवटचें कडवें वगळून) ह्या कवितांतुन कवीचें भावजीवी व्यक्तित्व दिसतें.

'कल्पतरु' ही कविता वाचतांना वाढणारी जिज्ञासा यत्नाला कल्पतरु म्हणण्यानें समाधान पावत नाहीं. बोधदृष्टीनें तें योग्य असलें तरी कवि-चमत्कृतीचा साक्षात्कार कांहीं विशेष पर्यवसानानें घडावा असें जें वाचका-ला वाटूं लागतें त्याचें ह्या बाळबोध पर्यवसानानें तर्पण होत नाहीं. 'सृष्टि कशी आहे' ह्या सुनीताच्या शेवटल्या दोन ओळींतली कल्पना "कर्तव्य कर्मा करूं" ही फारच कोपऱ्यांत आणि ओझरती आली आहे. खरें म्हणजे ती उठावदारपणें यायला हवी होती आणि त्या उठावदारपणासाठीं तिनें त्या दोन्ही ओळी व्यापायला हव्या होत्या.

तथापि एकंदरीत श्री. सहस्रबुद्धे ह्यांची कविता गूढ-गुंजन करीत नसल्यामुळें दुर्बोध नाहीं; ती गरुडभराऱ्या मारीत नसल्यामुळें वाचकाला टांगल्यागत होणार नाहीं; भावनेचा उद्दाम पूर तिच्यांत नसल्यामुळें गुद-मरल्यागत वाटण्याची शक्यता नाहीं; पांडित्याचा अवजडपणा नसल्यामुळें वाचकाला बुजायला व्हायचें नाहीं. तिचें रूप साधेसुधें आहे. ती मनानें मोकळी आहे. तिच्या विचारांत सारल्य आहे. भावना संथ व निर्मळ आहे. ह्या तिच्या गुणांमुळें कोणालाहि तिच्या सहवासांत घटका दोन घटका सुखानंदांत घालवतां येतील.

पुणें, २१-८-४६ यशवन्त दिनकर पेण्ढरकर

प्राध्यापक रा. श्री. जोग, एम.ए.

यांचा

# अभिप्राय

श्री. तात्याबुवा सहस्रबुद्धे हे एक आस्थेवाईक साहित्यभक्त म्हणून मिरजेकडील सर्वांनाच परिचित आहेत. विशेषतः काव्याविषयीं त्यांना अधिकच आस्था वाटते. त्यांच्या कांहीं कविता 'हुरूप' या काव्य-संग्रहामध्यें एकत्रित झालेल्या काव्य-वाचकांच्या वाचनांत असतीलच. 'हुरूप'मधील मनाची अवस्था या संग्रहांतील कवितांमध्यें साहजिक-पणेंच उरलेली नाहीं. " ओढ नसे उरली जिवाला " असें कवि आतां म्हणूं लागला आहे. काव्याविषयींची आपली दृष्टि कवीनें या संग्रहाच्या आरंभालाच स्पष्ट केली आहे. 'ठेवूं ध्येय उदात्त' 'लोकांना पुरवूं विचारधन' 'दावूं उन्नतिचाच मार्ग' इत्यादि गोष्टी डोळ्यांपुढें धरून काव्यरचना केलेली दिसते. या कल्पनेस अनुसरूनच या संग्रहांतील काव्य उतरलें आहे. विचार-प्रवणता, साधेपणा, सोज्वळ-पणा हेच या काव्याचे प्रमुख विशेष आहेत. काव्यामध्यें चमत्कारकारी असें कांहीं तरी असल्याविना— मग तो विचार असो, भावना असो कीं कल्पना असो— त्याचें कौतुक होऊं शकत नाहीं. साधेपणाचा गुण अभंग-स्वरूपाच्या त्यांच्या कवितांस अनुकूल ठरला असला तरी इतर कवितांस फारसा पोषक होत नाहीं. आकर्षकतेचा विचार सोडला तर बोधप्रिय रसिकांस पटेल आणि आवडेल असेंच काव्य तात्याबुवांचें आहे यांत शंका नाहीं.

पुणें, ता. १६।९।१९४६.

# शुद्धि-पत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | १२ | निरंहकृती | निरहंकृती |
| २१ | १३ | अश्रूपूर्ण | अश्रुपूर्ण |
| २३ | ११ | गणता | गणना |
| २७ | ३ | चित्त पक्षी | चित्त-पक्षी |
| २९ | १३ | रमानें | रमावें |
| ३१ | १३ | हा ताप | हो ताप |
| ४५. | ६ | क्मिणीला | रुक्मिणीला |
| ५० | २ | विचारी | विचारीं |
| ७३ | २१ | ध्येय | ध्येय |



# पाठराखणी

माझी आजची प्रस्तावनाकाराची भूमिका म्हणजे कण्वऋषींनीं शकुंतले-बरोबर पाठविलेल्या शार्ङ्गरवासारखी आहे. रसिकांच्या घरीं ' दुहिते 'ला पोचवितांना मीं तिला केवळ सोबत करावयाची नसून, बंधुत्वाच्या नात्यानें तिचें रक्षण व मार्गदर्शन करून, तिच्या पित्याला स्वास्थ्य लाभेल अशा रीतीनें तिला स्वस्थळीं नेऊन निरवावयाचें आहे. क्वचित् वाटेनें करमणूक म्हणून मार्गांतील सौंदर्यस्थळें दाखवून तिला रिझवावयाचें आहे. क्वचित् पांदीचे कांटेकुटे दाखवून तिला त्यांपासून दूर ठेवावयाचें आहे; इतकेंच काय, पण तिची अंतःप्रवृत्ति, संस्कृति व सुवृत्ति यांची ओळख पटवून देऊन तिला रसिक दुष्यंताच्या पदरांत घालावयाची आहे; आणि कदाचित् कांहीं व्यामोहामुळें तिची अवहेलना होण्याचा संभव असल्यास तिच्या बाजूनें दुष्यंतास व तिच्या चुकीबद्दल तिलाहि बोलावयाचें आहे. तथापि सासुऱ्यास जातांना ही ' दुहिता ' पुनःपुन्हा मागें वळून पहात आहे व तिचा शोकमग्न पिता पुनःपुन्हा आपल्या उपरण्याच्या पदरानें डोळे पुशीत आहे, हें दृश्य शार्ङ्गरवास फारच करुणरम्य वाटत आहे. आपल्या कन्येच्या गुणांविषयीं पित्याला कितीहि खात्री असली, तरी ती पतिगृहीं कशी नांदेल याची चिन्ता त्याला तापविल्याखेरीज रहात नाहीं. " एकदा ओपलेल्या कन्येची रसिक दुष्यंताला विस्मृति तर होणार नाहीं ? दुसऱ्या अनेक सुंदर रूपवती स्त्रियांना भुलून तो तिची अवहेलना करील का ? " अशा एक ना दोन अनेक शंकांनीं त्याचें अंतःकरण ढगाळून जातें व मग त्यांतून पाझरणाऱ्या सरी त्याला पदरांत टिपून घ्याव्या लागतात. अशा वेळीं शार्ङ्गरवासारखे बंधु पाठराखणीसाठीं असलेले बरे. बापाच्या हळुवार

अंतःकरणाचा ज्यांना अनुभव असेल, किंवा कन्यावियोगाचें दुःख ज्या कण्वांनीं अनुभवलें असेल त्यांना मी काय म्हणतों तें कळेल.

प्रत्येक पित्याची प्रत्येक कन्या अलौकिक, रूपवती व सर्वस्वीं सुगुणखनी असतेच असें नाहीं. प्रत्येकींत कांहीं तरी डावें उजवें हें असतेंच. तथापि ती पित्याची कन्या असते व त्याच्या घराचें वळण घेऊन परगृहाला वळण लावण्यासाठीं व दोन्ही घरांचा दुवा जोडून लौकिकदृष्ट्या 'सुगृहिणी' होण्यासाठीं ती चाललेली असते. ती रूपानें कशीहि असली तरी तिला कन्यापुत्रांना जन्म द्यावयाचा असतो व जगाला मातृपदाची व स्त्रीच्या कर्तृत्वाची थोरवी पटवावयाची असते. अशा थोर ध्येयानें पुढें चाललेली 'दुहिता' आज माहेर सोडून आपल्या घरीं निघाली आहे व तिला तिच्या घरापर्यंत सोबत करण्याचें काम मी करीत आहें.

पण ज्या गांवांत या 'दुहिते'ला स्थळ लाभत आहे त्याच गावांत तिच्या दोन वडील बहिणी नांदत आहेत व त्यांनीं आपल्या अभिजात वृत्तींनीं व बालबोध वळणांनीं रसिकांचें मन संतोषविलें आहे. श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांच्या 'भक्तिविलास' व 'हुरूप' या दोन पुस्तिका ज्यांनीं वाचल्या असतील त्यांना माझ्या म्हणण्याचें प्रत्यंतर येईल.

श्री. वि. ज. सहस्रबुद्धे यांच्या कन्या म्हणजे खेडुतकन्या आहेत. त्या 'उद्यानलता' नसून 'वनलता' आहेत. म्हणून त्यांच्याकडे नागरसौंदर्याच्या दृष्टीनें न पाहतां खेडुताच्या दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. शिवाय रूपगुणांनीं ही कन्या थोडीशी उणी भासत असली, तरी पित्याचें अंतःकरण हें सर्वत्र सारखेंच असतें; तेव्हां त्यानें तिला आपल्या परिस्थित्यनुरूप कोणतें वळण दिलें आहे व तिच्या ठिकाणीं कोणत्या संस्कृतीचा विकास झाला आहे हेंच पाहणें श्रेयस्कर होईल.

'दुहिते'च्या स्वभावाचें नीट परीक्षण केलें व तिच्या अंतर्वृत्तीचें

पृथक्करण केलें असतां तिच्या ठिकाणीं तीन चार प्रवृत्ति विशेषत्वानें असलेल्या दिसून येतात. श्री. सहस्रबुद्धे हे जात्याच पापभीरू व धार्मिक वृत्तीचे आहेत. त्यामुळें ऐहिक व पारलौकिक जीवन याचा ते नेहमींच आचार, विचार व उच्चार करतांना दिसतात. त्यामुळें ' आध्यात्मिक प्रवृत्ति ' किंवा ' ईश्वरप्राप्तीची हुरहूर ' ही त्यांच्या मनाचें सारखें शोधन करीत असताना दिसते. तथापि त्यांची धर्मभावना केवळ अंधश्रद्धेतून व पारंपरिक पंथातून आलेली नसून, तिच्यांत काहीं स्वतःच्या विचारांचा प्रवाह आहे. मला लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात—" आत्म-शुद्धीला साधन, अंतर्मुखदृष्टीनें संशोधन या दृष्टीनें परमेश्वराची करुणा भाकणें, त्याची प्रार्थना करणें याला मी महत्त्व देतों. " या आत्मशुद्धीचीं साधनें मिळविताना ते मधून मधून मनाला बोध करतात. ( मनास प्रश्न, झांकली मूठ, कर्तव्याची उपेक्षा, मानधन व तळमळ या कविता पहा. ) मनाला बोध करण्याची ओजस्वी परंपरा जुनी असली तरी अजूनहि ती ताजी वाटते व ती प्रसन्नता देते. त्यामुळें वरील कविता उद्बोधक वाटतात. श्री. सहस्रबुद्धे याचें मन धर्मप्रवण आहे, पण अंधश्रद्धाळू नाहीं, याची उत्तम साक्ष त्यांची ' देवाची तक्रार ' ही कविता देईल. अंधश्रद्धाळू ढोंगी भक्त आपल्या भक्तीच्या मिषानें अंतःकरणांत कोणकोणत्या वासना ठेवतात, देवाचे किती हाल करतात व स्वतःचा मूर्खपणा किती तऱ्हेनें प्रदर्शित करतात हें त्यांनीं फार समर्पकपणें दाखविलें आहे. त्यामुळें—

भक्त माझे अज्ञान, बुद्धिमंद
मार्ग माझा नच दिसत जणूं अन्ध
इष्ट नाहीं तें मजसि अर्पितात
कृपा माझी हे नित्य भाकितात.

बघुनि यांची विपरीत भक्ति-रीत
विडंबन हें मम वाटतसे होत

अशा भक्तांचा नावडेच संग
प्राप्त होतां तो टाळतो प्रसंग

असें म्हणण्याची देवावर पाळी आल्याचें ते मोठ्या धैर्यानें दाखवितात. आज भक्ति-संप्रदायांतील भक्ति गेली व तिची जागा स्वार्थानें किंवा ढोंगानें घेतली आणि त्यामुळें समाजाचा वैयक्तिक व सामाजिक अधःपात झाला, हें चित्रण एका डोळस श्रद्धाळू भक्ताच्या अनुभवांतून ऐकण्यांत विशेष स्वारस्य आहे.

'दुहिते'च्या मनाची ठेवण बहुतांशीं तत्त्वज्ञानी वृत्तीची आहे आणि केवळ कोरडें तत्त्वज्ञान म्हणजे काव्य नव्हे. उलट ईश्वरप्राप्ति हें साध्य व आध्यात्मिक प्रवृत्ति हें साधन मानून जेव्हां ती अभंग-श्लोकांचा आश्रय करते व आपल्या वेदना व संवेदना आर्तवाणीनें बोलून दाखविते तेव्हां ती काव्यपदवी पावते. या वृत्तींचें चित्रण विपदेचा गुण, अपेक्षा, श्रेष्ठ भक्ति, मार्ग चुकला, ओळख, शांतिस्थान, न्याय, मागणें या कवितांतून दिसेल. अशा वेळीं ती कधीं शारदामातेचा आश्रय करतांनाहि दिसते. या दृष्टीनें तिच्या वृत्तीचे कानेकोपरे 'शांतिस्थान' या सुंदर कवितेंत स्पष्ट प्रतिबिंबित झाले आहेत. त्यांत ईश्वरविषयक हुरहूर आहे, प्रापंचिक असमाधान आहे, व 'प्रपंचीं तूं मम विश्रांति' हा आशा-वादाचा सूरहि आहे.

आध्यात्मिक प्रवृत्ती सोडली तर 'दुहिते'च्या ठिकाणीं 'बालकें' 'स्वकीयांसंबंधीं जिव्हाळा' 'भारतभूसंबंधीं तळमळ' 'सामाजिक दृश्यें' व 'कवि व कविता' यांसंबंधीं कांहीं भावना उचंबळतांना दिसतात. बालकाचें गाणें ऐकतांना तिचें चित्ताचें चांचल्य पांगुळतें, व 'गायनी कळा' चित्ताकर्षक असल्याचा तिला अनुभव येतो. बालिकेच्या लीला पाहतांना तिला तन्मयता लाभते व 'प्रपंच शिशुविण वृथा' असल्याची प्रेमळ प्रतीति आल्याची ती बोलून दाखविते, इतकेंच काय पण प्रेमळ मातांच्या बाळांचें कोडकौतुक करतांना त्यांच्या दंग्याचें ती कौतुकानें वर्णन करते व

'यांनीं मला अगदीं घर सोडून जाण्याची पाळी आणली आहे' असा त्यांचा वात्सल्यगर्भ खोटा तिटकाराहि ती व्यक्त करते.

स्वकीयांसंबंधींच्या कवितांत दिवंगत व्यक्ति व एखादी प्रिय संस्था किंवा दूर जाणारा मित्र यांसारखे विषय आले आहेत. व्यक्ति व संस्था यांना उद्देशून लिहिलेल्या कविता 'प्रासंगिक' या सदरांत घालण्याची आजच्या टीकाकारांमध्यें एक दुष्ट प्रथा सुरू झाली आहे. पण याच टीकाकारांना 'यारो व्हिजिटेड्' 'शिलांगचा किल्ला' किंवा 'मिल्टनला उद्देशून लिहिलेलें सुनीत' या कविता सरस वाटतात. खरोखरी या इंग्रजी कविता सरस आहेतच, पण त्या प्रासंगिक सदरात आमचे टीकाकार घालीत नाहींत. ही त्यांची रसग्राहक वृत्ति नसून तो जेत्यांच्या सद्दीचा प्रभाव आहे. कवितेची परीक्षा केवळ तिच्या विषयावरून न करतां तिच्या गुणचित्रणावरून किंवा सरसतेवरून व्हावयास हवी इतकाच या म्हणण्याचा आशय. या दृष्टीनें 'दिवंगत मित्राचें स्मरण' व वियुक्त मित्रासंबंधींचा आविष्कार हृद्य आहे.

श्री. सहस्रबुद्धे यांना भारताच्या उत्कर्षाचीं स्वप्नें मधून मधून पडतात, व त्यावर त्यांचे विचार तरळतांना दिसतात. आज भारत 'दुर्गत' आहे पण उद्यां तो 'उन्नत' होईल ही आशा त्यांना वाटते. त्याचप्रमाणें आपण द्रुतगतीनें पुढें गेलें पाहिजे याची तळमळहि ते व्यक्त करतात. ध्वजदर्शनानें त्यांची स्फूर्ति उचंबळते व मग ते आपले राष्ट्रीय विचार प्रकट करतांत. हें करतांना त्यांची भावना उत्कटलेली दिसते. तुरुंगांतले अनुभव घेणाऱ्यांचे उद्गार काय असतील हें 'वृत्ती जडे मनाची' या कवितेंत चांगलें चित्रित झालें आहे. खऱ्या देशभक्ताचें मन कसें असतें हें

मन ज्या वसे ठिकाणीं। मी त्याच एक ठायीं
देहें असों कुठेंही। तेथें असून नाहीं
सुरमंदिरांत किंवा। कारागृहांत ठेलों
सुखदुःख काय तरि हो। तेथें मनेंच नसलों

चालेल राज-सत्ता देहावरीच सारी
शासील या मनाला ऐसा न दंडधारी

या ओळींवरून उत्तम प्रत्ययास येतें. श्री. सहस्रबुद्धे यांचें मन देश-भक्तिप्रवणहि आहे व त्यांच्या दृष्टीला देशांत होणारीं आंदोलनें दिसत आहेत त्यामुळें या विभागांतील चित्रण मनाला हलविणारें झालें आहे.

सामाजिक विषयांवरील कविता ( 'एक सामाजिक दृश्य' व 'लोकापवाद' ) दोनच असल्या तरी त्या उल्लेखनीय आहेत. यांपैकीं 'एक सामाजिक दृश्य' ही कविता मनांत अस्वस्थता उत्पन्न केल्याखेरीज रहात नाहीं. कचेरींत कांहीं कामानिमित्त आलेल्या एका रूपवती विधवेला नोकरवर्गाकडून कोणता त्रास होतो याचें हुबेहूब चित्र या कवितेंत कवींनीं उभें केलें आहे. या वेळीं असहाय झालेली अबला काय म्हणणार ? श्री. सहस्रबुद्धे यांनीं तें शेवटच्या ओळींत फार मार्मिकपणें घातलें आहे.

एकाकी बघुनी तिथें तिज अशी दुष्टप्रवृत्ती जन
पापी नेत्रकटाक्ष टाकुनि तिला दे दुःख भारी पण
दावी बाह्य सहानुभूति तिज तो हेतू कळे अंतरीं
या वेळीं करणार काय अबला धैर्येंच वर्ते तरी
देवाला म्हणते, कशास दिधलें नाथाविणें जीवन
आणी त्यांतहि सुस्वरूप असलें, दुःखास हो साधन !

या ओळींतील भावना कारुण्यपूर्ण आहे.

'कवि व कविता' हा श्री. सहस्रबुद्धे यांचा फार आवडता विषय दिसतो. या विषयावर त्यांनीं एकूण सात कवनें ( कवीचें समर्थन, कवीचें लक्षण, वागीश्वरीप्रार्थना, कवितासुंदरीस, उदासवाणें गान, कवि कल्पना, कविसम्राट् टागोर यांना ) लिहिलेलीं आहेत. यांत त्यांनीं कवीचें समर्थन केलें आहे, कवीचें लक्षण सांगितलेलें आहे, वागीश्वरीस आळविलें आहे,

करुणरसाची महती गाइलेली आहे, कवि-कल्पनेचें स्वरूप सांगितलें आहे व कविसम्राट् रवींद्रनाथांना सुमनांजलिहि वाहिलेली आहे. या कवितांत भावना विशेषत्वानें वावरतांना दिसते.

श्री. सहस्रबुद्धे यांची वृत्ति भाव-कोमल व अंतःकरण हळुवार आहे; पण त्याचा ओलावा त्यांच्या कवितेंत फार थोडा उतरतो; आणि याला एक-दोन कारणें आहेत. पहिलें असें कीं, त्यांची भावना उचंबळली कीं तीवर त्यांच्या चिकित्सक बुद्धीचें नियंत्रण बसतें व ती समोरील विषयाचें सौंदर्य केवळ तन्मयतेनें न पाहतां त्याचें तर्कपद्धतीनें विवेचन सुरू करते. आणि त्यांची हीच पद्धति काव्याला मारक होते. एखाद्या विहिरींत अमंचळ पाणी असावें पण मोटेला फाजील हेलकावे बसल्यास ती वर येतां येतां तें जसें थोडेंफार गळून जावें तशी त्यांच्या लेखनाची स्थिति होते. दुसरी गोष्ट म्हणजे त्यांच्या कवितेंत कल्पनेचा विलास कमी आहे. त्यालाहि कारण भावनेची झालेली गळचेपी हेंच होय. भावनेला भरपूर वाव दिल्यास तींतून सुंदर कल्पनांचा जन्म होईल. पण त्याचें अंतःकरण उचंबळतें, द्रवतें, अस्वस्थ होतें व त्यांतील भावना आकाराला येतांना किंवा त्या शब्दस्वरूप पावतांना त्यांची चिकित्सक बुद्धि तिला दूर सारून आपला अधिकार गाजविते, त्यामुळें कवितेचा विषय भावपूर्ण पण चित्रण तार्किक अशी स्थिति कित्येक ठिकाणीं झाली आहे. प्रत्यक्ष कल्पनेचें वर्णन करतांना ते म्हणतात—

करुन सोज्ज्वळ बहु हेममयी भूमी
तींत माणिक मणि पेरियले नामी
पुढें त्यावर पीयूषवृष्टि झाली
आणि अंकुरलें बीज योग्य काळीं

× × ×

कवि प्रतिभेची खचित दिव्य शक्ति
नवी निर्मितसे स्वर्गतुल्य सृष्टि.

परंतु प्रत्यक्षांत हिरे, माणकें किंवा नवी सृष्टि यांची उणीव भासते. कल्पना म्हणजे रस नव्हे, पण रसनिर्मितीला किंवा रसपरिपोषाला तिचा निश्चितपणें फार उपयोग होतो. श्री. सहस्रबुद्धे यांनीं आपल्या भाव-कोमल अंतःकरणाचा पाट कल्पनेच्या दाऱ्यानें फोडून सरळपणें आपल्या काव्य-क्षेत्रांत खेळवला तर त्या ठिकाणीं फुलबाग फुलेल अशी खात्री वाटते. कारण श्री. सहस्रबुद्धे यांनीं छंदःशास्त्र व काव्यशास्त्र यांचा व्यासंग केला आहे, त्यांचा अनुभव मोठा आहे, त्यांचें मन संवेदनक्षम आहे, त्यांनीं छंदांच्या अंगोपांगांची सूक्ष्म पाहणी केलेली आहे व त्याचा हुरूप दांडगा आहे. यामुळें त्यांना आपलें काव्यक्षेत्र फुलविण्यास कठिण जाणार नाहीं.

' दुहिते 'चे विचार नवीन, पण वळण जुनें-नवें असें संमिश्र आहे. अंतर्बाह्य रसरसलेलें नावीन्य तींत नसलें तरी जुन्यानव्यांतील चांगल्याची निवड करण्याची तिची अभिरुचि व धैर्य हीं प्रशंसनीय आहेत. तिची श्रद्धा दृढ व गाढी आहे, व तिला तिच्या जीवनापुरतें कांहीं निश्चित ध्येय आहे. तिची अंतर्वृत्ति भावपूर्ण व पृथगात्म आहे व सर्वच ठिकाणीं ती सरस नसली तरी ती सरळ, प्रामाणिक व प्रेमळ आहे. पित्याच्या वृत्तींतील ऋजुता तिनें आत्मसात् केलेली आहे, आणि म्हणूनच ती रसिकाला आपलेंसें करील असें वाटतें.

यापेक्षा अधिक येथें बोलणें बरें नव्हे. कारण " वधूचें भावी भाग्य कसें आहे हें तिला सासरीं पोंचविल्यावर वधूबंधूनें बोलूं नये " असा कवि कुलगुरूनें दंडक घालून दिला आहे. म्हणून इथेंच ' भर्तुर्बहुमता भव ' असा तिला आशीर्वाद देऊन परतणें बरें.

२२ जुलै १९४५ }
विश्रामबाग, सांगली }

गिरीश

# अनुक्रमणिका

श्री

# दुहिता

( स्फुट कविता-संग्रह )

ठेवूं ध्येय उदात्त निर्मल मनें
साहित्यसेवा करूं
लोकांना पुरवूं विचारधन तें
दारिद्य सारें हरूं
दावूं उन्नतिचाच मार्ग बरवा
ज्ञानप्रदीपें, तरी
हो साहित्यिक-धर्म-पालन खरें
तोषेल वागीश्वरी

## १ समय रुचिर हा

रात्रीचें राज्य सरे
तिमिरपटल दूर सरे
अरुण तेज हें पसरे
चहुंकडे पहा । समय रुचिर हा १

पूर्वदिशा ही खुलली
सौन्दर्ये जणुं नटली
स्वागतार्थ कीं सजली
दृक्सुखावहा । समय रुचिर हा २

द्विज कलरव नच करिती
सूर्यातें हे स्तविती
प्रात:सन्ध्योपास्ति
दुष्कृतापहा । समय रुचिर हा ३

विकसुनि हीं हसति फुलें
नैराश्या स्थळ नुरलें
उल्लासें जग भरलें
किंतितरी अहा ! । समय रुचिर हा ४

नवचैतन्य-स्फूर्ति
सृष्टिमधें हो क्रान्ति
तेविं घडो मम भारतिं
ही असे स्पृहा । समय रुचिर हा ५

दास्याची घोर निशा
संपावी कष्ट-दशा
प्रार्थितसे जगदीशा
पद-सरोरुहा । समय रुचिर हा ६

उदयाला भाग्यरवी
येवो प्रभु लवलाहीं
सौख्याचा दिन दावी
करि अनुग्रहा । समय रुचिर हा ७

सन १९२३

## २ वृत्ती जडे मनाची

( चाल—आनंदकंद० )

मन ज्या वसे ठिकाणीं । मी त्याच एक ठायीं
देहें असो कुठेंही । तेथें असून नाहीं १

सुरमंदिरांत किंवा । कारागृहांत ठेलों
सुखदुःख काय तरि हो । तेथें मनेंच नसलों २

सुग्रास वा कदन्न । दोन्ही मला समान
आहे क्षुधा मनाची । विषयोपभोग-भिन्न ३

बाह्य स्थितीवरूनी । ठरलों किती विपन्न
तरि भाग्यवन्त साचा । मन हें सदा प्रसन्न ४

चालेल राजसत्ता । देहावरीच सारी
शासील या मनाला । ऐसा न दंडधारी ५

मन हें स्वयेंच भीतां । हन्ता नको निराळा
भिववील केंवि मृत्यू । धारिष्टवन्त ज्याला ६

साम्राज्य भावनेचें । तेथील मीच राजा
अधिकार जन्मसिद्ध । तो घे न कोणि माझा ७

निरपेक्ष देहभोगीं । नाहीं क्षिती कशाची
देशोन्नतीविचारीं । वृत्ती जडे मनाची ८

सन १९२३

## ३ मनास प्रश्न

( वृत्त—पृथ्वी )

मना निशिदिनीं असें असिस तूं उदासीन कां ?
उदास असण्या तुला कवण हेतु आहे निका ?
असून जग रम्य हें तवचि दृष्टिला तेवढें
कसें दिसत रुक्षसें ! मजसि हेंच कोडें पडे १

पहा दिसुन ये जिथें निरत लोक सामान्य हा
परंतु विषयांत त्या तुज नसेच कैशी स्पृहा ?
विचित्र तव वृत्तिला जन-मनो-विरोधी अशा
बघून मज वाटतें खचित काय होसी पिसा ! २

घडीभर न राहसी मिळुन चार लोकांमधीं
तसें हृदय मोकळें करुनि बोलसी ना कधीं
"विचार कसला असा बसुन दूर एकीकडे—
तुझा सतत चालतो"? मजसि सांग कीं एवढें ३

मुदें दिवस सारिती, किति पुढें जनांची उडी!
परी वळुनि मागुती गणसि तूं घडीनें घडी
गतायु निज लागलें बघसि काय तें सार्थकीं?
मिळे फिरुनि सर्वही विगतकाल गेलाच कीं ४

निरर्थक असाच जो विषय लौकिकी दृष्टिला
परंतु परमार्थतः गमत सार्थ कां तो तुला?
म्हणून तिकडे तुझी जडलि काय एकाग्रता?
जगांत पुरुषार्थ तूं निवडिला तरी कोणता? ५

सुखार्थ तनुच्या किती जपति लोक नानापरी!
परंतु जनवृत्ति ही तुज दिसे न कां साजिरी?
असो कवणही स्थिती करिसि ना तियेची क्षिती
गमे तनुवरी वृथा करुन लोभ कां शेवटीं? ६

सुखाहुनि जगांत या अधिक दुःख आहे निकें
मिळेल चिर सौख्य ना कधिंहि इंद्रियांच्या मुखें
बहिर्मुखपणा मना म्हणुनि काय तूं सोडुनी
अतींद्रिय-सुखाचिया असासि मग्न संशोधनीं? ७

जरी सुकृत पूर्विचें मनुजजन्म लाधे तरी
कसा तुजसि ये अशा उबग जीविताचा परी?
तसें नसुनि; जन्म हा विफल जातसे, यास्तव—
मना दिसुन काय ये खचित खिन्नता ही तव? ८

प्रपंचसरितेमध्यें सकल आप्त-बंधू जन
जणूं सहज काष्ठसे जमुनि येति कांहीं क्षण
स्थिती बघुनि ही अशी भवविरक्ति बाणावया
तटस्थपण घेउनी करिसि वर्तना काय या? ९

जिथें निजुन राहती सकल, तेथ जागे मुनी
जनां दिवस जो गमे रजनि तीच त्यांलागुनी
तसा क्वचित हा तुझा उलट वर्तनाचा क्रम
तरी समजुं काय मी, तुजसि बोध हो कीं भ्रम? १०

सन १९२३

## ४ दिवंगत मित्रास

( चाल—ये अशी बैस० )

हें स्मरण, काय होऊन दुःखकर साचें
हाय! त्या दिवंगत झालेल्या स्वजनाचें १

जणुं आग, जाळिते अंग-अन्तरंगा ही
अति दाहक दुसरें यासम जगतीं नाहीं २

स्मृति जशी, बळावे तशी भरति शोकाला
ज्यापरी वाढतां कृष्णनिशा तिमिराला ३

मागुती, वळवुनी दृष्टि भूतकालांत—
गतगोष्टी बघतां चित्त चूर हो त्यांत ४

ठाकती, येउनी पुढति बेत केलेले
उपयोग काय पण, स्वजनांसह ते गेले ! ५

बहु रम्य, कल्पनागम्य कौशलें रचिले
ते मनोरथांचे वाडे सर्वच खचले ! ६

आधार, ज्यावरी भार ठेविला होता
सहकारी स्नेही असे कुठें तो आतां ? ७

त्याजला कोणत्या स्थला जाउनी वाहूं
कडकडून भेटूं डोळे भरुनी पाहूं ? ८

पिळवटे हृदय अति, कंठ रुद्ध शोकानें
उमटे न शब्द, मम अश्रुपूर्ण हीं नयनें ! ९

सन १९२३

## ५ प्रतापगड-दर्शन

( चाल—आनंदकंद० )

ये भक्त आदरें हा तव पुण्यदर्शनाला
तूझा 'प्रताप' महिमा श्रुत सर्वही जनांला १

प्राचीन वैभवाचे अवशेष भाग येथें
पाहीन दृष्टि भरुनी ऐसें मनांत होतें २

परि हाय ! मन्मनीषा ती निष्फलाच ठरली
अवलोकनीं समक्ष स्थिति सर्व भग्न दिसली ! ३

धड देहही तुझा हा नाहींच ठेविलेला
मग अन्य काय येथें मिळणें पहावयाला? ४

वाटे तुझ्या तनूची शत्रूस भीति काय?
हा देह वस्तुगत्या मातीच मूर्त होय! ५

चैतन्य ज्यांत नाहीं तो व्यर्थ देह असुनी
केलें परंतु तुजला विच्छिन्न कां म्हणूनी? ६

पुरुषार्थ काय होता मेल्यास मारण्याचा?
करणार कोण नाहीं धिक्कार या कृतीचा? ७

पाहूं इथें 'प्रतापा' येऊन काय तूतें?
त्वद्दु:स्थिती बघूनी मज दु:ख मात्र होतें! ८

'अफ्झूलखान' मोठा सरदार मोंगलांचा
मांडीत डाव कपटी संधी करावयाचा ९

पण धीर धैर्यवन्त तें ओळखी शिवाजी
ठरवून बेत पुढचा भेटीस होत राजी १०

कांट्यास कंटकेंच जो न्याय काढण्याला
त्या नीतिनें शिवाजी हो मारिता तयाला ११

तुज देखतां क्षणीं तो ठाके प्रसंग पुढती
इतिहास आणखीही स्मरतो तसाच चित्तीं १२

पण तो शिवाजि राजा, रणशूर मावळे ते
नाहीं स्वराज्यलक्ष्मी कांहींच आज येथें १३

पूर्वेतिहास अमुचा त्याच्याच स्मारकाचें
अन्वर्थ हें 'प्रताप' त्वन्नाम-धाम साचें १४

तूं क्षेत्र राजकीय त्वद्दर्शनार्थ यावें
पूर्वस्मृती धरूनी स्वत्वास जागवावें १५
याहून काय करणें हातीं नसेच अन्य
आम्हीहि भोगितोंच त्वत्तुल्य आज दैन्य १६

* * *

जातों, निरोप देईं कां व्यर्थ होसि खिन्न?
आहे मनांत काय येतो तरी कळून १७

* * *

वदते न त्यास कांहीं येई गळा भरूनी
सांगे परी तयाची ऐसेंच मूकवाणी १८
"होतों स्वराज्य-भोगी, व्हावें पुन्हां तसेंच"
ध्वनि आज सर्व ठायीं राहे भरून हाच १९

सन १९२३

## ६ झांकली मूठ

(वृत्त—पृथ्वी)

[ प्रसंगः—संक्रांतीच्या दिवशीं शेजारचीं लहान मुलें मला तिळगूळ देऊन माझ्या पाया पडूं लागलीं त्या वेळीं मनांत आलेले विचार. ]

तुम्ही करूं नका नमस्कृति मला पदां स्पर्शुनी
नसे किमपि पात्र मी खचित वंदनालागुनी
वयें गुरुपणा न ये, गुणाचि पाहिजे गौरवा
गुणेंच जगिं मान्यता मिळतसे खरी मानवा १

प्रफुल्ल तुमचा असा    मुख-शशी बघूनी, अहा !
मदीय हृदयाब्धिला    भर चढे पुरेपूर हा.
विचारलहरी किती    उठति त्या मिती ना, पहा.
तुम्ही शिशु न वाटतां    पुरुष थोर भावी अहां. २

तुम्हांस अवमानणें    शिशुपणाकडे पाहुनी
मला न बरवें दिसे    पुढिल काल घेतां मनीं.
चरित्र तुमचें जणूं    खचित 'झाकली मूठ' ही !
महत्त्व कळणें कसें ?    नुघडितांच ती अल्पही ३

लहान असलां तुम्ही    तरी कितेक ते सद्गुण
तुम्हांत दिसतात, जे    प्रकटवीति मोठेपण.
स्वभाव तुमचा किती    सरल, वृत्ति आनंदित,
अहांन निरंहकृती,    स्वपर-भावना-वर्जित. ४

मलाच उलटें असें    गमत कीं, नमावें तुम्हां.
खरोखर कळे न हें    कवण बीजरूपें अहां !
तुम्हांतुनचि हो उद्यां    निपजतील ऐसे जन
यदीय चरणांवरी    जगत घेइ लोटांगण ! ५

असे मधुर बाल्य हें    परमसौख्यदायी किती !
मिळेल फिरुनी तरी    प्रिय न कां वयस्कांप्रती ?
परंतु कुठलें पुन्हां ?    अलभ तें वृथाचि स्पृहा.
म्हणून म्हणतों तुम्ही    खचित भाग्यशाली अहां ! ६

जशीं उपवनीं फुलें,    तशिं तुम्ही पहा बालकें
प्रसन्न-मन कोण तो    बघुनि हो न युष्मन्मुखें ?
विभूषण गृहा मुलें,    सुम-गणेंच शोभे वन.
जगास रमणीयता    उभयतांविणें कोठुन ? ७

तुम्हीच पुढली पिढी भरतभूमिची या अहां.
बघून तुमच्याकडे दिवस कंठिते ती पहा!
स्वराज्य-सुख-शालिनी तिज करावया पौरुषें
समर्थ जन व्हा तुम्ही प्रभुस मागणी ही असे. ८

सन १९२३.

## ७ शांति-क्षमेचे धडे

( चतुर्दशक )

गेले पोट भकाळ, अन्न मिळतें केव्हां असें जाहलें.
अन्नावांचुनि जीव हा जगविणें कोणेपरी नाकळे!
'अन्नब्रह्म' चि एक आज पुरतें आम्ही असूं जाणत.
आम्हां स्वोदर-पोषणाहुनि दुजा 'सद्धर्म' नाहीं हित.

ग्रन्थीं 'जीवित' नाम या चहुंकडे मोठ्या सुवर्णाक्षरीं!
सारें लेखन 'अर्थपूर्ण' दिसुनी येतें अनेकापरी.
अर्थावांचुनि 'वाचणें' गमतसे आम्हां अनर्थावह.
अर्थानें 'परमार्थता' मिळविली आपत्प्रसंगीं इह.

देवाचें मुखिं नाम ये, पण पुढें पाहून मृत्यूप्रत
व्हावा मोक्षहि दुःस्थितींतुन अशा, आहोंत उत्कंटित!
अस्मज्जीवन साच यापरि असे हें धार्मिकप्राय कीं
आपत्तमजनास लीन म्हणण्या अन्या नको लायकी.

× × ×

जे संपत्तिमदें प्रमत्त असती सांगा तयांच्या पुढें
आम्हांला कथणें अकारण, दया-शांति-क्षमेचे धडे.

सन १९२४

## ८ संकल्प-सिद्धि

[ मिरजेंतील श्रीअंबाबाई तालीम संस्थेच्या व्यायामशाळेच्या उद्घाटन-समारंभाच्या वेळीं— ]

( चाल—आनंदकंद० )

या मंदिरास आजी पाहून मूर्त पुढती
दृष्टी बहू सुखावे जैशी मधु-प्रभातीं १

संकल्प दीर्घ काल होता मनांत धरला
तो ये फळास म्हणुनी संतोष फार झाला. २

अंगीं उभारलेले रोमांच हे न असती
वृत्तीच दर्शनार्थ प्रकटत्व आदरीती. ३

हृदयास येत भरती आनंद तो न मावे,
बाहेर नेत्रमार्गें अश्रु-स्वरूप धांवे. ४

उद्देश यत्नपूर्व सारे अदृश्य असती
तेव्हां महत्त्व त्याला दे कोण काय जगतीं? ५

तैशामधें विशेष— उद्दिष्ट तें असे कां?
कोठून मान त्याला होईच मात्र टीका! ६

निंदापवाद आणी साहूनही विरोध
लागे करावयाला जनतेंत तत्प्रबोध. ७

ऐशा स्थितीमधून काढून मार्ग साचा
हा आज योग आला तत्सिद्धि पाहण्याचा. ८

विघ्नेंच उन्नतीला होतीं खरीं सहाय
त्याच्याच दाखल्याचा हा मूर्त लेख होय ! ९

उगमीं समान दोन्ही ओढा तशीच सरिता
तद्भेद ये कळोनी कालान्तरेंच पुरता. १०

कार्य-प्रवाह मोठा जों ना दिसून आला
जनतासहानुभाव कोणा कधीं मिळाला. ११

भगवन्त तोहि पूर्ण निजभक्त-सत्त्व पाही.
त्यावांचुनी प्रसन्न सहजीं कदा न होई. १२

सांठाच सत्कृतींचा, परिपाक ऐक्यमतिचा
सामर्थ्य संघ-गत जें आदर्श हा तयांचा. १३

या मंगल-प्रसंगीं होई मनःस्थिती जी
ती सांगण्यास वाणी नाहीं समर्थ माझी. १४

श्लोक—उपसंहारात्मक

सत्संकल्प करा, सुनिश्चय धरा, कर्तव्य सोडूं नका.
विघ्नें येउत तीं त्यजा न वरिला जो एकदां मार्ग का
"अन्तीं जातचि सिद्धिला अमर तें सत्कार्य केव्हांहि हो"
होई सूक्तिच ही 'अनावृत' खरी व्यायामशाळा न हो.

सन १९२४

# ९ सृष्टि कशी आहे ?

( चतुर्दशक )

आहे जीवितयुद्ध सन्तत सुरू चोहोंकडे दुर्धर,
येई जीवनभूत जीव दिसुनी एका जिवाचा पर,
हिंसा-धर्मचि तो खरा ठरतसे, खोटा अहिंसापर
नाहीं न्याय जगीं, दया मग करी ती कोण कोणावर ?

नाहीं स्वार्थ कुठें, तसा कलहही, निःस्वार्थता नान्दते,
प्रेमाकर्षण येतसे अनुभवा जेथें पहावें तिथें,
नाहीं दुःख मुळीं, भरून उरला आनंद विश्वामधें,
आहे विश्व अतीव रम्यचि खरें, कोणी असेंही वदे.

सृष्टी द्वंद्वमयी कुणी म्हणतसे, शीतोष्ण इत्यादिक—
—द्वंद्वें हींत पहा अनेक असती तीं इष्ट, आवश्यक !
सृष्टी ही परमार्थतः खरि नसे कोणी असे बोलती.
कोणाला न कळे स्वरूपाचि हिचें आश्चर्यवत् पाहती !

× × ×

सृष्टि-ग्रन्थ बुधांहि गूढचि खरा, मी तों असें लेकरूं
त्याचा अर्थ कशास लावित बसूं ? कर्तव्यकर्मा करूं !

सन १९२४

# १० कर्तव्याची उपेक्षा

( चतुर्दशक )

नाहीं उत्कट एकही गुण जरी, मोठा नसें मी कुणी,
टाकाऊ न परी तयें ठरतसें, विश्वास ऐसा मनीं
माझीही महती असेच जगतीं कांहीं तरी निश्चित
वेळेला किति टांचणीविण नडे कोणा न हें विश्रुत ?

आहे ही वसुधा खरोखर जरी संपन्नरत्ना, तरी—
लोहाला नच काय किंमत मुळीं, तें व्यर्थ कां भूवरी ?
जे माझ्यासम मंदबुद्धि असती त्यांना तयांच्या परी
आहे कार्य जगांत नेमुन दिलें, ही योजना ईश्वरी.

गंगेची सरि ओहळाप्रत न ये, तीच्याकडे पाहुनी—
ओढ्यानें पण वाहणेंच अपुलें चालेल का टाकुनी ?
ओढे-ओहळ कैक एकवटती तेव्हांच होते नदी.
सानांचा समवाय तोच मिरवी श्रेष्ठत्व लोकांमधीं.

× × ×

वायां कां खचवूं मनास अपुल्या नाहीं मुळीं कारण
कर्तव्याविषयीं नकोच करणें आतां उपेक्षा क्षण.

सन १९२४

# ११ हा कोण ?

( चतुर्दशक )

मोठा भव्य दिसून ये पुरुष हा माझ्यापुढें संमुख
राहे दूर उभा परंतु न कळे आच्छादुनी कां मुख
आहे कोण म्हणून यास बघण्या जातां तयाच्याकडे
घेई कां पद मागुतें भरभरां जावें जसें जेवढें
दे ना ओळख, यास कारण तरी आहे बरें कोणतें
होतां ज्ञात, अनर्थ काय घडुनी येईल याच्या मतें
याचें दर्शन घ्यावयास झटतां वाटे जसें दुर्घट
तैशी उत्सुकता मदीय हृदयीं होईच अत्युत्कट.
याचें रूप न ये दिसून तरिही आकर्षिलें मन्मन
जिज्ञासा बहु लागली कवण हा घ्यावेंच हें जाणुन
याचा आणिक आपला गमतसे संबंध कांहीं तरी
जीवाचें मम लक्ष त्याविण कसें लागेल याच्यावरी.

× × ×

माझें नांव "भविष्यकाळ" बघ, मी अज्ञात राहें नित
केव्हां ज्ञात न होय, यांताचि खरें आहे जगाचें हित.

सन १९२४

# १२ सुवर्णभूमि

( चाल—आनंदकंद० )

"होती सुवर्णभूमी आतां तुरेच तैशी"
ऐसें नको म्हणाया हा बोल एकदेशी १

आतां नसेल तैशी संपन्न संपदेनें
पावे विपन्नतेला हें साच एकपरिनें २

पोटास आज पुरतें नाहीं तसेंच वस्त्र
दारिद्र्य नित्य वाढे संपन्न नाम मात्र ३

संपन्न भू असूनी नाहीं तदीय महती
नसतील वीररत्नें तेथें जरी खरीं तीं ४

माती जशी तनू ही नसतां तिच्यांत प्राण
तैशीच वीर-रत्नाविण हेम-भू 'असून ५

धन-संपदेहुनी या नर-रत्न-संपदेचें
वैपुल्य दाखवीतें हें नाम आर्यभूचें ६

पूर्वेतिहास सांगे वीर-प्रसू म्हणून
विख्यात आर्यभूमी; आहे तशी अजून ७

"नाहीं सुवर्णभूमी" वच हें म्हणूं खरेंच
म्हटल्यास रत्नभूमी होईल सार्थ तेंच ८

नर-वीर-संततीला नाहींच खंड पडला
भाग्योदयीं म्हणून आशा असे कवीला ९

सन १९२५

## १३ बाळाचें गाणें

[तीन वर्षें वयाचा बालक आपल्या बोबड्या बोलांत आपल्या समजुतीप्रमाणें गोड गाणें गात असलेला पाहून– ]

( चाल—भूपती० )

गा, दिव्य गायका असाच राहीं गात
वाटतें सारखें ऐकावें तव गीत १

इंद्रियें सर्वही गोळा झालीं श्रवणीं
विषयांस सोडिलें आपआपल्या स्थानीं २

चांचल्य अनावर पांगुळलें चित्ताचे
थांबलें मनाचें तसें स्वैरपण साचें ३

गायनीं काय तव जादू आहे न कळे
जाणत्या जिवाला मोहुनि मज टाकियलें ४

ध्वनिमधें पाहतां व्यक्त अर्थ ना कांहीं
पण गानें तुझिया बुद्धि वेधुनी जाई ५

परिसावे जों जों श्रवणीं गीतालाप
तसतसा पावतो विलय मनःसंताप ६

काळजी, दुःख वा खेद कोणता नुरला
आनंद सर्वथा अन्तर्बाह्यचि भरला ७

या दिव्य गायनें बंधन जड देहाचें
आपाप सुटोनी, सुख लाधे स्वर्गींचें ८

विसरुनी जगाला गानानन्दीं बाळा
आहेस गुंग तूं, तसेंच केलें मजला ९

लोपलें अहंपण, द्वैतभाव मावळला
मज अद्वैताचा अनुभव गानीं आला १०

गायनी कळा ही चित्ताकर्षक भारी
गाणार त्यांत तूं चतुराई तव न्यारी ११

मधुरता तुझ्या या गाण्याची कळण्यास
पाहिजे पित्याचें अन्तःकरणचि खास १२

ज्या हृदयीं प्रेमा अपत्यविषयक नाहीं
तो म्हणेल तुजला 'बरळे कांहीं बाहीं' १३

तव गान अलौकिक गायनशास्त्रातीत
कोणास कळो वा न कळो, राहीं गात १४

जन गुणज्ञ असती विरळचि जगतीं, तरि तूं
मजसाठीं गाईं, पुरवीं माझा हेतू १५

सन १९२५

## १४ एक सामाजिक दृश्य

( चतुर्दशक )

रूपें सुंदरशी वयें तरुण जी सौभाग्य-चिन्हें उणीं
शोभे बाळ जिच्या कटीवर अशी नारी मराठा कुणी
कांहीं कार्यनिमित्त येउन उभी होती कचेरीमधीं
कर्ता पूरुष ना, प्रसंग तरि हा स्त्रीच्यावरी ये तधीं

होतें कां नच काम आज म्हणुनी चिन्तेंत मुद्रा दिसे
कोणाशीं नव्हतीच ओळख, तिनें कोणा पुसावें कसें
बाळाचें रमवावया मन करी गोष्टी तयाच्या सर्वें
कंठाया निज काळ साधन तिला कांहींतरी तें हवें

एकाकी बघुनी तिथें तिज अशी, दुष्टप्रवृत्ती जन
पापी नेत्र-कटाक्ष टाकुनि तिला दे दुःख भारी पण
दावी बाह्य सहानुभूति तिज तो हेतू कळे अन्तरीं
या वेळीं करणार काय अबला धैर्येंच वर्ते तरी

\+ + +

देवाला म्हणते, कशास दिधलें नाथाविणें जीवन
आणी त्यांतहि सुस्वरूप असलें, दुःखास हो साधन

मन १९२६

## १५ मित्रास निरोप देतांना

( चाल--आनंदकंद० )

आला भरून कंठ हो अश्रूपूर्ण दृष्टि
तुजला निरोप देतां मन हें अतीव कष्टी १

प्रिय हा कसा वियोग व्हावा सुहृज्जनाचा
जड मानसें परंतू करणेंच सह्य साचा २

कर्तव्य आपुलालें राहून एक ठायीं
करतां नये म्हणून येते वियुक्तता ही ३

देहेंच भिन्न दोघे हृदयैक्य पूर्ण वागे
अन्योन्य-संगतीची कधिं कामना न भागे ४

लोटे बहू सुखाची त्वत्संगतींत वेळा
स्मृति होत राहणार त्याची घडोघडीला ५

असुनी प्रपंच-ताप नाहीं कळून आला
संभाषणीं; विचारीं रंगून जीव गेला ६

कधिं भांडलों प्रसंगीं धरिला न कोप चित्तीं
विसरून सर्व जावें ऐशी मनःप्रवृत्ति ७

डोळेभरीं बघूं दे दृढ भेटुं देच मातें
न स्वस्थ चित्त राहे बाहेर धांव घेतें ८

सन १९२८

## १६ उत्कर्षाची आशा

( वृत्त—शार्दूल० )

ये जेव्हां रजनी महीवर तदा अंधार दाटे किती
तीचें रूप अतीव भीषण दिसे सर्वत्र दृष्टीप्रती
वाटे ती बहु कष्टदायक जनां, ऐशी जरी दुःस्थिती
रात्री संपुनि भास्करोदय परी होणार ही निश्चिती १

पानें सर्व फुलें गळून पडती, लोपेच रम्याकृती
झाडें आणि लताहि जीर्ण वठुनी गेल्या परी भासती
आली हीन दशा कितीहि शिशिरें सृष्टी तरी ती पुन्हां
होतां प्राप्त वसंत-काळ बरवा होईल भाग्यावहा २

चक्राकार-गती परी कवण जो खालीं पहा जातसे
तो येईच फिरून खास वरती हें काय ठावें नसे ?
पावे ओहटि मागुनी भरति त्या येणार सिंधूप्रत
आहे दुर्गत आज भारत तरी होई पुढें उन्नत ! ३

सन १९२८

## १७ कवीचें समर्थन

( वसंततिलका )

वेड्यांत कोणि गणता कविची करोत
आम्हांस मान्य पण हें न कधींच होत
थोडें समर्थन पहा, कविच्या गुणाचें
लोक-प्रवाद बहुधा नसतात साचे १

संग्राह्य अर्थ असतां बहु हा प्रपंचीं
वाटे न अल्प महती कविला तयाची
अर्था परंतु जपतो कवि नित्य भारी
शब्द-प्रपंच करि काय अनर्थकारी ? २

स्वच्छन्द वर्तन कवी करितो, म्हणावें
त्याला निरंकुश असें कुणि नांव द्यावें
मात्रा, यती, यमक आणि अनेक छंद
यांचा कवीस असतो पण कोण बन्ध ३

ये ना कवीस करतां व्यवहार नीट
विक्षिप्त कर्म कविचें ठरवोत धीट
त्याला परंतु असल्याविण सूक्ष्म दृष्टि
काव्यांत केविं रचतो व्यवहार-सृष्टि ४

वस्त्रें यथोचित कधीं नसती कवीचीं
त्याला नसे रुचि सुवर्ण-विभूषणांचीं
सालंकृता पण असे कवि-कन्यका ती
अंगीं तिच्या कुठुनि येइ सुवर्ण-कान्ति ५

युष्मन्मतें कितिहि नीरस हा कवीचा
धंदा असो विफल, शुष्क कसाहि साचा
त्याची परंतु रस-निर्भर काव्य-गंगा
संतोषवील नित ती रसिकान्तरंगा ६

शके १८५०

# १८ जन-रीति

( वृत्त—दिंडी )

वायु-संगें वाहून गन्ध येई
पथें जातां चित्तास तोष देई
"असे सुंदर सुम सुरभि हें अतीव"
म्हणुनि वाखाणित जाइ लोक सर्व १

कुसुम आहे पण कोणत्या स्थितींत
लतेवरती वा मग्न कर्दमांत !
शोध याचा करि काय कधीं कोणी
खरा सहृदय जन विरळ ये दिसोनी २

पुष्प-गन्धें पावोन किती तोष
अल्प त्याचा घेती न परामर्श
फुका शब्दाचा धन्यवाद देती
गुणज्ञाची ही योग्य नव्हे रीती ३

सन १९२८

# १९ सुवर्ण-चतुष्टय

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

सर्वांना कळते सुवर्ण[१]महती आबालवृद्धाप्रती
चालेना व्यवहार त्याविण जगीं आहे जरी निश्चिती
ज्ञानाचें पण त्याजहून ठरतें श्रेष्ठत्व तें पाहतां
ज्ञानी निर्धन, वा निरक्षर धनी, सांगा बरा कोणता ?

\+ \+ \+

काळ्यांचा छळ गौरवर्ण करिती हें पाहतों प्रत्यहीं
वर्ण-द्वेष दिसून येत जगतीं प्राचीन काळांतही
वर्णाच्या वरती न ये ठरवितां श्रेष्ठत्व वा हीनता
शोभा दे न सुवर्ण[२], शील मनुजा तें भूषवी सर्वथा

\+ \+ \+

वाणी ही अभिधा–"सुवर्ण[३]गण जे इष्टार्थवाही"–तया
अर्था आश्रय हे सुवर्ण असती, काया जशी आत्मया
वाणीनें व्यवहार सर्व घडतो, ती बोलणें सूनृत
वाणी संस्कृत हेंच भूषण खरें, नोहे सुवर्णान्वित[४]

\+ \+ \+

आकाशांतुनि वर्षते घन-तती का थोडकें तें जल ?
होई शुक्ति-पुटींच जें पडतसे तें मात्र मुक्ता-फळ
भू-भागांत शिळा असंख्य, कितिना देवत्व लाभे पण
दीर्घायुष्य असून कीर्तिकर ते थोडे सुवर्ण-क्षण !

सन १९२८

१ सुवर्ण = सोनें. २ सुवर्ण = चांगला रंग. ३ सुवर्ण = चांगलीं अक्षरें.
४ सुवर्णान्वित=सोन्याचें.

## २० कवीचें लक्षण

( अभंग )

भूमीवरी देह पण चित्त पक्षी
कल्पनान्तरिक्षीं विहरतो १
वर्तमानकाळ चर्मचक्षूपुढें
भविष्याच्याकडे अन्तर्दृष्टि २
लोकांत असूनी एकान्ताची गोडी
उकलाया कोडी धरियेली ३
लौकिकविषयीं नसेचि आसक्ति
आत्म-रत-वृत्ति सदा राहे ४
दिसतो सामान्य परी विचक्षण
कवीचें लक्षण आगळें हें ५

शके १८५०

## २१ मान-धन

( वृत्त—दिंडी )

दीनवाणें वच बोलुं मुखें केवीं
कंठ खेदें किति दाटुनियां येई
खचित लज्जास्पद दीन जिणें वाटे
उचित जगणें पोटांत भरुनि कांटे १

पात्र भिक्षेचें घेतलिया हातीं
सद्‌गुणांची बहुमोल होय माती
तुच्छतेचें हो स्थान याचकत्व
दीनतेच्या जगण्यांत काय सत्त्व २

क्षुद्र वृत्तीनें प्राप्त संपदा जी
मान-धन तो तिज हो न कदा राजी
विपत्तीला सेवून सुखें राही
स्वाभिमाना त्यजणार कधीं नाहीं ३

मान अथवा अपमान तुल्य ज्याला
जन्म त्याचा स्पृहणीय काय बोला
जपे जीवाहुनि मान-धनालागीं
अधन असला तरि तो नव्हे अभागी ४

मीठ-भाकर जी स्वावलंबनानें-
लाभलीसे ती भोग्य खरी जाणें
आदरूनी दैन्यास मिळालेली
कशी लागावी गोड तूप-पोळी ५

जरी आलें दारिद्र्य भोगण्याचें
तरी दूषण तें काय म्हणायाचें
बनुनि पुरुषार्थी मानवें जगावें
प्रसंगाला धारिष्ट बाळगावें ६

सन १९२८

## २२ भाव तसें फळ

( छंद—अभंग )

" भाव तैसें लाधे फळ " । नाहीं बोल । हा वृथा १
अनुभव पाहूं जातां । पटे चित्ता । तत्त्व हें २
दाम मिळे कामा ऐसा । साधा तैसा । हिशेब ३
पेरीयलें तेंच पिके । यांत चुके । कोणतें ४
उठे पडसाद केवीं । ध्वनी जेवीं । त्यापरी ५
न्याय सृष्टीच्या राज्यांत । पक्षपात । दिसेना ६
वाग करूनि विवेक । सुखदुःख । भोगितां ७

सन १९२८

## २३ वागीश्वरी-प्रार्थना

( मंदारमाला )

सेवा करावी तुझी नित्य वाटे
रमानें तुझ्या गायनीं पूजनीं
वेंचे प्रपंचीं परी काळ भारी
मिळे अल्प तो लावितों कारणीं १

दुर्लक्ष होतें प्रपंचीं कितीदां
नव्हे तें सदा शक्य किंवा भलें
कर्तव्य माझें कुटुंबीय तेंही
अगत्यें मला पाहिजे पाहिलें २

वाटे विधीची विचित्राच लीला
कुठें एक कोठें दुजें तें उणें
निन्दूं कशाला विधीला परंतू
स्थिती लाभली ती बरी मानणें ३

चित्तीं असा आणितों मी विचार
"नसे विघ्न किंवा विरोधी स्थिती
आहे जिथें गे पुरें आनुकूल्य
परीक्षा तिथें भक्तिची कोणती !" ४

ज्याच्यावरी त्वत्कृपा जाहली तो
गमे भाग्यशाली मला सर्वथा
लक्ष्मीयुता मान लोकीं असो दे
खरें पाहतां त्या नसे सार्थता ५

संताप होतो प्रपंचीं तथापि
तुझ्या संनिधीं लाभते शान्तता
संसार-सिंधूंतली तूंच नौका
तुझ्यावीण आधार ना कोणता ६

ओढा खरा अन्तरींचा मदीय
मिलिन्दापरी त्वत्पदाब्जाकडे
नाहीं उपाधी जिथें कोणतीही
तुझें स्थान विश्रांतिचें तेवढें ७

वागीश्वरी, प्रार्थना ही म्हणून
करी दास हा नम्र तूझ्या पदीं
सेवा यथाशक्ति होवो अखंड
तुझी भक्ति माझ्या बळावो हृदीं ८

बुद्धी प्रगल्भा नसे संस्कृता वा
तुवां स्फूर्ति द्यावी प्रसंगीं मला
जाईल सिद्धीस हेतू तरीच
करूं काव्य ये काय वाग्दुर्बळा ९

सन १९२८

## २४ अज्ञान वाटे बरें !

( शार्दूलविक्रीडित )

या विश्वीं मम बालदृष्टिस पुरा[1] आनंद तैसें सुख-
होतें येत दिसून पूर्ण भरलें सर्वत्र तें संमुख
ज्ञानाचे उपनेत्र हे जडवितां तें विश्व आतां नुरे
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें १

होती बालपणांत मोह-[2]रजनी ती पौर्णिमेची यदा
शान्तीच्या तधिं कौमुदींत मन हें भोगीत होतें मुदा[3]
ज्ञानाचा पण सूर्य हा उगवतां हो ताप त्याच्या करें[4]
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें २

१ पुरा = पूर्वी. २ मोह-रजनी = अज्ञानाची रात्र. ३ मुदा = आनंदास. ४ करें = किरणानें.

ठावें हें नव्हतें "जगीं निधन या प्रत्येक वस्तूप्रत"
होती ही मधु कल्पना खचित कीं, "आम्ही चिरंजीवित"
ज्ञानानें पण भास तो ठरविला, ग्रासें मृतीच्या[1] दरें[2]
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ३

होतों घोरत रम्य बालपणिंच्या अज्ञान-निद्रेमधीं
माझें स्वप्न-सुखांत त्या मन पुरें निश्चिन्त होतें तधीं
ज्ञानाच्या पण सत्त्व-जागृतिमुळें चिन्ता हृदीं वावरे
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ४

होता मोह-वसन्त-काल-महिमा बाल्यांतला तोंवरी
सौख्याचा फुलबाग पूर्ण फुलला होता मनोभूवरी
ज्ञानाच्या शिशिरें तथापि सुकलें उद्यान तें गोजिरें
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ५

बाल्याच्या शुभ शारदीय समयीं हें हृत्तडागोदरें[3]—
आनंदोदक-पूर्ण शान्तहि बहू होतें किती सुंदर
ज्ञान-ग्रीष्म परंतु हा प्रकटतां आटूनि गेलें पुरें
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ६

द्वैताचें मज बाल्य-काल असतां अज्ञान होतें, तदा
ठावा भेद मुळीं न आप-पर हा माझ्या विशुद्धा हृदा[4]
ज्ञानानें पण आज बुद्धि बिघडे, स्वार्थीपणा संचरे
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ७

१ मृति = मरण. २ दरें = भीतीनें. ३ हृत्तडागोदर = हृदयरूप सरोवराचा अन्तर्भाग. ४ हृदा = हृदयाला.

होतों जाणत मातृदैवत जगीं बाल्यामधें एकलें
माझें चित्त तदा अनन्यगति तें होतें तिथें रंगलें
सज्ञानत्व मला करी पण किती अश्रद्ध तर्कादरें[1]
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ८

सत्याचीं महती मला न कळली होती जरी तेधवां
खोट्याचा अवलंब मीं चुकुनही केला नसे केधवां
आतां होउनि जाणता धजतसें खोटें कराया खरें
होतें तें पहिलेंच यास्तव मला अज्ञान वाटे बरें ९

१ तर्कादरें = तर्कविपर्यीच्या आदरामुळें.

सन १९२९

## २५ विपदेचा गुण

( वृत्त—दिंडी )

किती निन्दो जन कोणि आपदेस
तिचे दावो उकलून विविध दोष
म्हणो, देते ती ताप सदा भारी
तिची संगत नच होय सौख्यकारी १

कृपा लक्ष्मीची आवडेच सर्वा
प्राप्त होतां ती वाहि मनुज गर्वा
भोग-विषयाहुनि त्यास नुरे ध्येय
तेंच मानी प्राप्तव्य जगीं श्रेय २

पडत जेथें विस्मरण तुझें जीवा
तिला सुस्थिति म्हणणें न योग्य देवा
स्मरण सन्तत तव आपदेंत होतें
म्हणुनि इष्टचि ती साधुजना वाटे ३

सन १९२९

## २६ शुभ संकल्पावें मनीं

( छंद—अभंग )

कल्पतरूपरी मन
इच्छावें तें करी पूर्ण १
उठे मानसीं तरंग
तो न पावे कधीं भंग २
राहे धरूनियां मूळ
जात नाहींच निष्फळ ३
त्याचा घडोनि संस्कार
बने बुद्धीचा आकार ४
याचसाठीं रात्रंदिनीं
शुभ संकल्पावें मनीं ५

सन १९२९

## २७ तुलना

( चाल—भूपती )

धड वस्त्र एकही नसेच अंगावरती
लक्तरेंच अवघीं तनुचें रक्षण करती १
जे मिळतिल भिक्षा मागुनि तुकडे जसले
त्यांवरी भरावें पोट कसें तरि अपुलें २
धर्मार्थ-सदन वा देउळ पडकें कोठें
पाहून आश्रया जावें रात्रीं तेथें ३
अनुकंपनीय हो अशी स्थिती असतांही
अन्तरीं कशाचा खेद नसे पण कांहीं ४
देखुनी भिकारी असा नवल मज गमलें
हा सुखी मानितो जीवित केवीं अपुलें ५
कोणत्या गुणें हा आहे प्रमुदित-वृत्ति
तद्विषयक उपजे जिज्ञासा मम चित्तीं ६
तों– येइ कळोनी "अज्ञानचि हा खास"
कोठून ठाउका जीवन-हेतू यास ७
अंधार गाढतम भरला याच्या हृदयीं
कल्पनाच नाहीं उच्च जीवनाविषयीं ८
स्थिति आर्थिक तुळितां याच्याहुनि मम बरवी
शान्तता जिवाला माझ्या पण नच ठावी ९
ज्या उच्च भावना, विचार, परिचित मजला
टोंचणी तयांची कधींच नाहीं याला १०

इतिकर्तव्यचि हा समजे उदरंभरण
मी तुष्ट त्यांत नच, म्हणून राहें खिन्न ११

सन १९२९

## २८ बालिकेस

( चाल—**सुरेख संगम०** )

मनोज्ञ लीला किती । तुझी ही । मनास सुखवी अती ॥ ध्रु० ॥

बोबडे बोल ऐकतां
कोकिला-गान-मधुरता
यापुढें वाटते फिकी । श्रवण हे । सदैव माझे भुकी १

तव रुचिर हास्य पाहतां
सुम-विकास-रमणीयता
दृष्टिला गमतसे उणी । तुझ्या या । प्रफुल्ल वदनाहुनी २

अंबरीं शुक्र तारका
तूं तशीच गृहिं बालिका
तेजस्वि अधिक तूं परी । चमकसी । अतीव सदनान्तरीं ३

दरवळे गंध उपवनीं
मधुमास पावतां क्षणीं
आनंद तुझ्या स्वागतें । भरे हा । तसाच गृहिं वाटतें ४

वांकुल्या करुनि दाविशी
तो विनोद रुचतो मशीं
ही अपूर्व अभिनय-कला । खरोखर । कुठून लाभे तुला ५

खेळसि न एकली स्वतां
मज मागसि सहकारिता
तो तुझा पुरविता लळा । मिळे जणुं । फिरून शैशव मला ६

मारितां मला तूं मिठी
प्रेमाश्रु-भरित हो दिठी
स्फूर्तीच येइ कविकडे । गमे हा । तसाच संगम घडे ७

धांवतां बघुनि दुडदुडा
मम मनोरथचि रोकडा
विहरतो स-तनु हा घरीं । गमतसे । मनास गे यापरी ८

चुंबितां कपोलाप्रती
लाभते माधुरी किती
ती सुधेपरिस मधु खरी । म्हणावी । अलभ्यशी सुरवरीं ९

हा प्रपंच शिशुविण वृथा
ती व्यथा नुरे मम अतां
नैराश्य-निशा मावळे । सुखाची । प्रभात हो तुजमुळें १०

मजवरी प्रभूची दया
हो लाभ तुझा म्हणुनियां
वाटतें खरोखर मला । सुदैवा । नसेच माझ्या तुला[१] ११

सन १९३०

१ तुला = उपमा.

## २९ देवाची तक्रार

( वृत्त—दिंडी )

भक्त माझे अज्ञान, बुद्धिमन्द
मार्ग माझा नच दिसत जणूं अन्ध
इष्ट नाहीं तें मजसि अर्पितात
कृपा माझी हे नित्य भाकितात १

बघुनि यांची विपरीत भक्ति-रीत
विडंबन हें मम वाटतसे होत
अशा भक्तांचा नावडेच संग
प्राप्त होतां तो टाळितों प्रसंग २

पाठ माझ्या करितात चरित्राचा
बोध नाहीं त्यांतील रहस्याचा
कपी-सेना लंघून सिंधु गेली
तिला त्याची पण ये न कळुन खोली ३

अनीतीचें योजून कर्म खोटें
नवस करती सिद्धीस जावयातें
नसे नवसाच्या वस्तुचा भुकेला
कसा पावूं या मूढ भाविकाला ४

नाच-गाणें करतात पुढें माझ्या
परी केवळ त्या होत खचित मौजा
मला उद्देशुनि अन्न-दान हो जें
प्रसादाला तें नाममात्र साजे ५

मन्निमित्तक ही करुन जीव-हिंसा
प्रकट रीत्या घेतात मद्य-मांसा
गुरुत्वाचें बहु माजवुनी बंड
भक्त म्हणविति पण असति धर्मलंड ६

तीर्थयात्रेस्तव फिरुनि सतत वायां
कष्टवीती कां बहुत आत्मकाया
निकट असतां हृदयींच वास माझा
शोध घ्यावा अन्यत्र कवण काजा ७

मुखें कोणी जपतात नाम-मंत्र
परि न करिती संकल्प मनिं पवित्र
सदाचाराचें पथ्य सोडुनीयां
"नाम-मात्रा" घेऊन खचित वायां ८

रूढ पूजा-विधि विकृतरूप होई
त्यांत भक्ति-प्राधान्य कुठें नाहीं
व्यर्थ अवघे उपचार भक्तिहीन
शुद्ध भक्ती विरळाच ये दिसून ९

बाह्य आचारा मान मिळे लोकीं
मुख्य तत्त्वाला कवण ना विलोकीं
सत्य-धर्माची जागृती कराया
पाहिजे मज अवतार पुन्हां घ्याया १०

सन १९३०



## ३० एक वेळ

(अभंग)

किती होवो ज्ञानी तरी एक वेळ
त्यास जाणवेल अल्पज्ञता १

कोणी झाला किती विषय-विलासी
विटेल तो त्यासी एक वेळ २

यत्नवादी किती असो दैव तया
येईल प्रत्यया एक वेळ ३

द्रव्य-सत्ता-मदें चढो कोणी किती
येईल खालती एक वेळ ४

अधःपाता मग न लागे अवधि
उपजो दुर्बुद्धि एक वेळ ५

सुस्थिती संसारीं सारखी न टिके
कष्टदशा ठाके एक वेळ ६

स्मरूनि सर्वदा वागावें निर्मळ
मृत्यू एक वेळ प्राप्त आहे ७

सन १९३०

# ३१ लोकापवाद

[ एका विधवा स्त्रीचें हें आत्मगत म्हणणें आहे ]

( चाल—सुरेख संगम किति )

कुणास सांगूं व्यथा । मनींची । कळे न मज सर्वथा ॥ ध्रु०

बहु आप्त सोयरे जरी
दाविती प्रेम मजवरी
पण सहानुभूती खरी । तयासी । नसेच, हो खातरी १

ये सूज शरीराप्रती
म्हणतील पुष्टताच ती
जन वस्तुस्थितिच्याकडे । बघेना । कशास ऐकिल रडे २

पर-दुःख जाणुनी मनीं
द्रवणार विरळ नर-मणी
तो कुठून मजला मिळे । वदाया । नकोच हें वेगळें ३

किति शुद्ध वागलें तरी
हो जनापवाद न दुरी
तूं अन्तरसाक्षी हरी । परीक्षा । तुलाच होइल खरी ४

नैराश्य-तिमिर चहुंकडे
कांहींच दिसेना पुढें
मम कुंठित झाली गती । कृपेचा । प्रकाश कर श्रीपती ५

मनिं विचार ताप-द किती
येतात नसे त्या मिती
जड जिणें वाटतें मला । नसे स्थल । कुठेंच विश्रान्तिला ६

मी अनाथ मज रक्षिता
तूं एक जगत्पति अतां
हा अश्रु-सुमांजलि तुझ्या । पदाविण । कुणास वाहूं दुज्या ७

सन १९३०

## ३२ सीमोल्लंघन

( शार्दूलविक्रीडित )

देशाची बदले परिस्थिति किती आचार पूर्वागत—
—ते ते सर्व तसेच आज करतां होणार नाहीं हित
कालाला अनुरूप सेव्य तितकें सोडून तद्भिन्न तें
सीमोल्लंघन देश-काल बघुनी साधावया लागतें   १

जें एकास पहा हितप्रद असे, अन्यास तें घातक
जें एका समयास पुण्यकर तें, वेळीं दुज्या पातक
जें एका स्थलिं वंदनीय ठरतें, अन्यत्र हो निंद्य तें
सीमोल्लंघन-तत्त्व यावरुनि तें जाणूनि घ्या कोणतें २

काळाचा अनिवार ओघ जगतीं, स्थित्यन्तरें इष्ट तीं—
—तो आणी घडवून सन्तत, पहा पूर्वेतिहासाप्रती
आज्ञा काल करी परिस्थितिपरी, वागा तसें साजिरें
सीमोल्लंघन हें यथार्थ करणें लागेच अत्यादरें   ३

होती आक्रम-शील-वृत्ति बरवी ती पूर्वजांची तधीं
आम्ही स्वस्थ असे रुतून बसलों या दास्य-पंकामधीं
गेले देश दुजे पुढें, प्रगत ते! आम्हीं किती दुर्गत !
सीमोल्लंघन हें अवश्य म्हणुनी आम्ही करूं या द्रुत ४

शके १८५१

## ३३ रूप तुझें हें गोड

( चाल—राम स्मरावा राम० )

रूप तुझें हें गोड । किती तरि । रूप तुझें० ॥ ध्रु० ॥

सुखवी माझ्या जिवास भारी
त्यास न दुसरी तोड १

तुझिया लाभें वाटे मज हो-
स्वर्ग-सुखाची जोड २

प्रेम-दृष्टिला माझ्या न दिसे
तुझ्या ठिकाणीं खोड ३

माझें मन घे एकसारखें
तुझ्याकडे नित ओढ ४

जपतें तुज कशि, सांगूं तूं तळ-
-हातावरचा फोड ५

गृह-रत्नाविण गृह हें शून्यचि
प्रपंच वठकें खोड ६

काय हवें तुज सांग राजसा
पुरविन सारे कोड ७

सन १९३०

## ३४ पारिजातकाची कथा

(छंद—ओवी)

एकदां घेउनी बसे भामा हट्ट
पाहिजे प्राजक्त नंदनींचा १

तेव्हां तो कृष्णानें इंद्राशीं समर
करूनि सत्वर संपादिला २

भामेच्या सदनीं लावितां आणून
त्यायोगें भांडण उद्भवलें ३

पडतां तें वृत्त रुक्मिणीच्या कानीं
वैषम्याचि मनीं तिला वाटे ४

कृष्णाला ती म्हणे, "प्रीति माझ्यावरी
तुमची न खरी समजलें" ५

मात्सर्यानें तिला क्रोध बहू आला
धरी ती अबोला श्रीकृष्णासी ६

चतुर कृष्णानें काढुनियां युक्ति
दोघींचीहि प्रीति राखियेली ७

भामा-गृहीं राहे पारिजात परी
फुलें प्राप्त सारीं रुक्मिणीला ८

* * *

पुनरावृत्त ही कथा हो भारतीं
दिसते संप्रति आम्हांलागीं ९

मिथ्या कां मानाव्या पुराणींच्या गोष्टी
रूपान्तरें येती प्रत्ययासी १०

उद्भिज्ज-संपदा-संपन्न असतां
दुर्भिक्ष भारता केवीं यावें ११

पिके येथें परी नुरे लेशभरी
जाई देशान्तरीं नानारूपें १२

पारिजातापरी अद्भुत प्रकार
घडतो साचार आज येथें १३

नामतः पूर्वीचें " कृष्ण-कारस्थान "
सार्थ अभिधान आज त्याचें १४

सन १९३०

## ३५ कविता-सुंदरीस

( चाल—बघ निशाण वर हें० )

तव छंद पुरा मजलागिं जडे
तुजवीण सुचेना अन्य गडे ॥ ध्रु० ॥

तूं आणिक मी दोघें जेथें
एकान्तचि तो प्रिय बहु वाटे
जनांत बसणें नकोच कोठें
उदास तुजविण चोहिंकडे १

व्यवहाराची गजबज दिवसा
संधि न गवसे तव सहवासा
समय रात्रिचा निवान्त खासा
तदा खरी तव भेट पडे २

नम्र सदा तव चरण-सरोजीं
न करीं मजवरि कधिं इतराजी
चुकतां तुझिया सेवेमाजी
मम चित्ताचें स्वास्थ्य उडे ३

हौस मनाची भारी ऐशी
" सुवर्ण-शोभा " वाढायासी
" अलंकार " बहु घालुनि तुजसी
विहरावें तव मूर्तिपुढें ४

अनुपम साचें सुख तव संगीं
केविं कळावें इतरांलागीं
भ्रमरावांचुनि कमल-परागीं
रमति न पंकांतील किडे ५

सन १९३०

## ३६ बाळाचा संसार

(दिंडी)

खेळ बाळा रे हा तुझा पहातां
नवल माझ्या बहु वाटतसे चित्ता
ब्रह्मयासम नव निर्मितोस सृष्टि
तुझ्या ठायीं हो वसत सृजन-शक्ति १

जनां आम्हां संसार थाटण्यास
कष्ट पडती किति, माप नसे त्यास
मांडिलासी तूं दगड-खापऱ्यांचा
तरी भासतसे प्रेक्षणीय साचा २

काम-धेनू तुजजवळ कल्पनेची
पडत नाहीं तुज न्यूनता कशाची
गमे किमया वा होय तुला प्राप्त
करिशि मातींचें हेम तूं क्षणांत ३

असति संसारीं विविध जे प्रकार—
लग्न-कार्यादिक, करिशि तदनुसार
लिप्त आम्ही आहोंत जसे त्यांत
तसा त्यांच्या तूं नसशि बंधनांत ४

प्रौढ म्हणतीं संसार तुझा खोटा
सत्य गणती निज, गर्व तया मोठा
परी करितां परमार्थ-विचारास
असारचि हे संसार उभय खास ५

पाहुं जातां संसार तुझा श्रेष्ठ
थाटतां ये केव्हांहि तुज यथेष्ट
असे अमुचा स्त्री-पुत्र-धनापेक्ष
मनाजोगा पण हो न कधीं लेश ६

तुवां केलें अनुकरण आमचें हें
परी संसारीं व्यंग तुझ्या नोहे
तुझा सोज्ज्वळ संसार मी विलोकीं
सार तितुकें घेतोस तूं विवेकी ७

ठेवुनीयां निजबुद्धि अनासक्त
करावा हा संसार कसा नीट
वस्तु-पाठें तूं शिकवितोस काय
बोध घ्यावा, हें खचित इष्ट होय ८

सन १९३१

## ३७ तळमळ

( छंद---**अभंग** )

आहे आम्हांपाशीं तुलनेची दृष्टि
तेणें आम्ही कष्टी होत नाहीं १
सुस्थिति संसारीं असो वा दु:स्थिति
तयाची न क्षिती करूं केव्हां २
पूर्ण सुखी कोणी नयेचि दिसून
कोठें कांहीं न्यून आढळतें ३
कनिष्ठाच्याकडे देखूनियां मनीं
सदा समाधानी आम्ही असूं ४
एकचि लागली आम्हां तळमळ
जन्म हा सफळ कांहीं व्हावा ५

सन १९३१

## ३८ तत्त्व-जिज्ञासू

( चाल—**भूपती०** )

तूं काय शोधिसी सूक्ष्म करुनियां नयन
हरवली तुझी का वस्तू आहे कवण १

कोणता प्रश्न तव पडला आहे पुढती
म्हणुनि ही विचारीं निमग्न दिसते वृत्ति  २

भटकसी सारखा असा कासया सतत
तुज जायाचें तें स्थान नसे का विदित  ३

प्रिय सुहृद् तुझा का कोणी सोडुन जाई
तव चित्त रमेना म्हणुन कोणत्या ठायीं  ४

एकटाच असशी, रुचतो का एकान्त
तव परिचित कोणी नसेच या लोकांत  ५

वदशी न कुणाशीं कां मुख-दुर्बळता ही
कीं भाषण-विषयचि तुझा अलौकिक कांहीं  ६

तव देह वागतो भूमीवरती मात्र
मन कुठें हिंडतें उगाच कां अन्यत्र  ७

तव लोक-विलक्षण वर्तन दिसतें कां हें
तुज वेड कशाचें सांग लागलें आहे  ८

व्यवहार सर्व हा " अर्थमूल " अवगणसी
परमार्थ कोणता त्याहुनि वाटे तुजशी  ९

दुर्लक्ष तुझें कां प्रपंच-विषयीं ऐसें
संसार कशास्तव उपेक्ष्य तुजला भासे  १०

तूं विचार सोडुनि या प्रस्तुत समयाचा
करितोस भावि कां अनंत-कालावधिचा  ११

* * *

( अनुष्टुप् )

कशी व्हावी तुम्हां माझी । परीक्षा बाह्य लक्षणीं
मी असें तत्त्व-जिज्ञासू । रत अध्यात्म-चिन्तनीं

सन १९३१

## ३९ अपेक्षा

( छंद– अभंग )

पामर मी खरा परी बळ मोठें
श्रद्धेचें नांदतें माझेपाशीं १

तुझें पद-रज लागो माझ्या माथां
पावेन मान्यता जनामाजी २

सांनिध्य घडतां कस्तूरी-मृगाचें
मोल मृत्तिकेचें चढतसे ३

परिसाच्या स्पर्शें क्रांति घडे केवीं
सुवर्ण-पदवी लोह पावे ४

स्वातीचें उदक पडे शुक्ति-पुटीं
तेणें दिव्य मोती होय त्याचें ५

त्याजहूनि तुझी अलौकिक शक्ति
तिची मी महती काय वानूं ६

प्रभो कृपा-दृष्टि करीं दासावरी
अपेक्षा दुसरी नाहीं मज ७

सन १९३१

## ४० वेड

( चाल– येशि कशाला दारीं० )

वेड कुणाला कांहीं
दिसुनि जगीं या येई ॥ ध्रु०

वेडचि तें मग
काय म्हणे जग
विचार याचा कधिंही
वेड्याला नच राही १

सुख-दुःखाची
निन्द्म-स्तुतिची
क्षिति तो करिताचि नाहीं
मानी सम दोनीही २

तो स्वच्छंदी
आत्मानंदीं
सदैव रंगुन जाई
भान उरेना देहीं ३

परंतु थोडे
असले वेडे
देवा तुझिया पायीं
अर्पियलें मन ज्यांहीं ४

वेड तुझें पण
वाटे साधन
मुक्ति जिवाला देई
लागावें तें मजही ५

सन १९३१

## ४१ निन्दा

(भुजंगप्रयात)

तुझ्यासारखें गोड वाटे न कांहीं
तुझ्यासारखें श्राव्य कांहींच नाहीं
तुझ्यावीण काल क्रमायास इष्ट
नसे कोणता मार्ग लोकीं वरिष्ठ १

सुखाला जगीं तूंच आहेस हेतू
खरी एक विश्रान्तिची साउली तूं
मनोरंजनाचें तुझ्यासारखें तें
मला नाढळे स्थान अन्यत्र कोठें २

तुझ्या संगतीचा नसे वीट कोणा
तुझ्यावीण तो काळ कंटाळवाणा

तुझ्या लागले लोक नादीं प्रभूत
वसे मोहिनी दिव्य कांहीं तुझ्यांत ३

अडाण्यास जैशी, तशी शिक्षिताला
गरीबाप्रमाणेंच लक्ष्मीयुताला
स्त्रियां आणखी पूरुषां सारखीच
जनां सर्वही तूं प्रिया एकलीच ४

तुला साधु दोषास्पदा लेखितात
तुझ्यापासुनी दूर ते राहतात
परी पूर्ण निर्दोष आहेत कोण
तुला निन्दणें योग्य नाहीं म्हणून ५

जिथें चार होतात एकत्र लोक
तिथें येउनी ठाकसी तूं अचूक
तुझ्या स्वागतावांचुनी बैठकीला
कधीं कोणत्या रंग नाहींच आला ६

तुझ्यावीण कोणास केव्हां कुणाची
कराया स्तुती ये न निर्भेळ साची
तुझ्यानेंच रम्यत्व ये भाषणांत
तुझें थोर माहात्म्य वाढे जगांत ७

तुझी स्वर्गमर्त्यादि लोकांत तीनी
गती सर्वसंचारिणी ये दिसूनी
तुझा त्याग केला असे लोक थोडे
खरे ते विरागी म्हणूं वीर गाढे ८

सन १९३१

## ४२ कुचंबणा

( जाति– प्रणयप्रभा )

मन तळमळतें बहु हळहळतें
यांतून सुटाया धडपडतें ॥ धृ०

लोह-शृंखला नसती पायीं
सभोंवतीं वा तुरुंग नाहीं
नसे दिसाया बंधन कांहीं
परि ' स्वतंत्र ' ऐसें यावरुनी
मज गणूं नका हो व्यर्थ कुणी १

बसून राहे मउ गादीवरि
शिक्षा नाहीं सक्त मजूरी
खडि फोडाया नच लागे, परि
मी ' सुखी ' असावा अशी कुणी
करुं नका कल्पना व्यर्थ मनीं २

भाजी-भाकर मिळेल तसली
अर्धीकच्ची खावी, असली–
–खाण्याची स्थिति माझी नसली
तरि अन्न लागतें गोड मला
करुं नका समज हा कुणि अपुला ३

कुचंबणा किति होय अंतरीं
अक्षम ती कथण्यास वैखरी
सत्य आपल्या विचारापरी–
कधिं वागाया मज येत नसे
ही बंदी मोठी भासतसे ४

केवळ आर्थिक सुस्थितिमाजी
समुचित नाहीं असणें राजी
व्यर्थचि जगणें करून ‘ हा जी ’
ही जाणिव निशिदिनिं तापविते
मज वाटत नाहीं शान्ति कुठें ५

सुवर्ण-पंजरिं शुक तो असुनी
जिणें स्वताचें क्षुद्रचि मानी
सदैव दिसतो असमाधानी
तें सुख कां बाह्य-स्थितिवरती
ठरवील कोणता तत्त्व-मती ६

सन १९३१

## ४३ श्रेष्ठ भक्ति

( अभंग )

आंधळी भावना पंगु तो विचार
व्हावें परस्पर-सहकार्य १

स्त्री आणि पुरुष यांची जमे जोडी
संसारांत गोडी तरी नांदे २

युक्तीला शक्तीचें मिळे पाठबळ
तरी ती सफळ होय जगीं ३

साचार जें ज्ञान तेंच पूर्ण साजे
निष्क्रिय तें ओझें शिरीं वायां ४

वैराग्य असावें विवेकानें युक्त
जरी परमार्थ साधायाचा ५

देवा तुझें आणि भक्ताचें अद्वैत
होणें हीच श्रेष्ठ भक्ती खरी ६

सन १९३१

## ४४ उदासवाणें गान

( चाल—उदय कधीं होणार० )

उदासवाणें गान । असे हें । मलाच माझें छान ॥ धृ०
गाऊं द्या हो मज एकान्तीं
कुणी नका जमुं माझ्याभंवतीं
कलकल तुमची कर्ण-प्रान्तीं
पडतां करि व्यवधान । असे हें १

आवडता रस जो सकलांला
प्रवेश नच त्या शृंगाराला
आळवितों मी करुण-रसाला
तयाचेंच हें स्थान । असे हें २

शिशिर समय अनुकूल गावया
शीर्णपर्ण तरु-वर लतिका या

दिसति समुत्सुक श्रवण कराया
श्रोते मजसि समान । असे हें ३

मारुत राहे हा साथीला
निःशब्दपणा इष्टचि मजला
स्फूर्ती आल्यावरि गवयाला
कशाची न मग वाण । असे हें ४

सूर यामधें मधुर कोठले
तुमच्या परिचित रागामधले
'विराग' युक्तचि गायन सगळें
व्हाल कधिं न रममाण । असे हें ५

गायक मोठा मी स्वच्छंदी
गुंग सर्वदा आत्मानंदीं
रहात नाहीं मज या नादीं
व्यवहाराचें भान । असे हें ६

मजेंत बसुनी गादीवरती
ऐकायाची रूढ पद्धती
अनुचित येथें विलास-वृत्ती
मनोरंजक न गान । असे हें

अधिकारी जन तोच येथला
प्रपंच-तापें बहुत पोळला
उपरति झाली प्राप्त जयाला
लागे प्रभु-पदिं ध्यान । असे हें ८

सन १९२१

## ४५ मार्ग चुकला !

( छंद–अभंग )

तुज शोधायासी गेलों रानीं वनीं
जवळी असूनी हृदय-स्था १

शिळा-धातु-मूर्ती शिणलों पूजितां
नेणलें जनता-रूप तुझें २

गंध पुष्पादिक केले उपचार
तत्त्वाचा विचार आव्हेरिला ३

आत्म-निवेदन हा खरा नैवेद्य
हेंच एक वेद्य पूजनांत ४

माझी फसगत झाली पहा देवा
केलेली ती सेवा वायां जाय ५

चुकला मार्गचि तुझिया प्राप्तीचा
पावावास कैंचा मजला तूं ६

असतांना माझा, दोष तुज दिला
करावी दयाळा क्षमा त्याची ७

सन १९३२

## ४६ ओळख

( छंद—अभंग )

केव्हां काय केलें पुण्य किंवा पाप
याचें आहे माप स्वतांपाशीं १

आहोंत कसे हें आपण पहावें
जगा काय ठावें खरें रूप २

बाह्य लक्षणांनीं परीक्षितें जग
त्याला अन्तरंग केवीं कळे ३

घडे जें जगाचें मत नव्हे साचें
महत्त्व न त्याचें म्हणोनियां ४

लौकिकाविषयीं राहे उदासीन
आत्म-परीक्षण नित्य करी ५

सन १९३२

## ४७ शिक्षकास

( छंद—अभंग )

आणायाचें आहे इष्ट आकाराला
संस्कार बाळाला करोनियां १

मृत्तिकेचा जणूं गोळाच हा ओला
नाहीं कांहीं ज्याला नामरूप २

द्यावा तैशापरी पावेल आकार
घडो दे सुंदर मूर्ति याची ३

हळूवारपणें चालवावा कर
ठेवून नजर गुणग्राही ४

पहा तुझा किती श्रेष्ठ अधिकार
होई मूर्तिकार कुशल तूं ५

देव वा दानव निर्मिण्याची शक्ति
दिली तुझ्या हातीं विधात्यानें ६

तुझ्याकडे मोठें सत्कार्य हें आलें
सद्भाग्य आपलें जाण मनीं ७

सन १९३२

## ४८ चित्त-चाचल्य

(छंद—अभंग)

समुद्राला जैशी भरती ओहटी
होते तैशी चित्तीं विकारांची १

केव्हां स्तब्ध वायू केव्हां झंजावात
तैसें चित्त शान्त केव्हां क्षुब्ध २

कालमानापरी ग्रीष्म केव्हा वर्षा
तैसें हर्षामर्षा चित्त पावे ३

आशेचा प्रकाश केव्हां चित्तामधीं
दाटे तम कधीं निराशेचें ४

चित्ताचें चांचल्य नित्य एवंविध
सुखदु:खास्पद तेंच होई ५

चित्ताची समता राखावी संतत
जरी आत्म-हित साधायाचें ६

सन १९२२

## ४९ ध्वज-दर्शन

(वैनायक वृत्त)

स्फूर्तिप्रद तव दर्शन आमच्या मना
स्तुति-सुमनें पूजूं तुज गाउनी गुणा १

तुज पाहुनि हेलावे भावनांबुधीं
आमचिया प्रेमाचा तूं कला-निधी २

भगवा हा त्यागाचा रंग शोभतो
त्यागाविण सुलभ नसे मुक्ति-लाभ तो ३

फडफडुनी कथिसी जणुं यत्न-शीलता
यत्नानें इष्ट-सिद्धि हो, न अन्यथा ४

आर्यांच्या संस्कृतिचें सत्प्रतीक तूं
शौर्याचें धैर्याचें मूर्त चित्र तूं ५

उज्ज्वल इतिहासाची वितरुनी स्मृती
ठेवितोस आशेची ज्योत जागती ६

उच्चतमीं भूभागीं राहुनी उभा
उन्नतिचा पथ दाविसि पाडुनी प्रभा ७

आर्यांना जें कांहीं " मान-धन " असे
निधि त्याचा करुनी तुज ठेविला दिसे ८

रक्षणीय सर्वथैव जाणुनी तुला
तुजसाठीं पूर्व-जनीं जीव वेंचिला ९

दैवत तूं राष्ट्राचें आमच्या भलें
जन आम्ही भक्त तुझे, धन्य तुजमुळें १०

तुजाविषयीं भक्ति-भाव नांदतो मनीं
प्रकट तोच होय पहा वंदनार्पणीं ११

सन १९३४

# ५० वैषम्य

( छंद—अभंग )

अत्यशनें रोग कोणालागीं होई
कोणी अन्नाभावीं तडफडे १

वस्त्र-भाराखालीं एक गुदमरे
दुसरा तो मरे थंडीमुळें २

कुबेरा लाजवी कोणाची श्रीमन्ती
दारिद्र्यें पीडती किती एक ३

धनवन्त राहे विलासांत चूर
राबतो मजूर जिवापाड ४

मऊ गादीवरी खुपतें कोणास
कोणी पाषाणास शेज करी ५

उभारले कोणी वाडे आणि बागा
निवाऱ्याची जागा कोणा नाहीं ६

विद्येच्या शिखरीं चढले कित्येक
अक्षर-ओळख नसे कोणा ७

एकीकडे वाहे सुखाचाच पूर
दुःख भरपूर दुजे ठायीं ८

जगीं नादायाचें वैषम्य तोंवर
नाहीं परस्पर-बंधु-भाव ९

सन १९३४

# ५१ चिन्ता

( वृत्त—दिंडी )

असासि चिन्ते तूं खचित दुष्ट मोठी
तुझी संगत बहु घातकरी, खोटी,
तुझ्यापासुन नित दूर रहावें हें
गमे सौख्याचें, तेंच इष्ट आहे १

अग्निची तूं दुहिताच जणूं काय
जिता असतांही जाळितेस काय[1]
हविर्द्रव्याविण होय अग्नि शान्त
तुझ्या तापाला कधिंच नसे अन्त २

ग्रहामाजी जरि राहु शनी मोठे
खरे पाप-ग्रह ते न परी वाटे
एकदां तूं राशीस लागलीस
कदा सोडत नाहींस त्या नरास ३

राज-यक्ष्मादिक रोग विविध जाति
प्राण-हारक होतात जरी अन्तीं
कराया ये तदुपाय जीवमात्रा
तुझ्यावरती चाले न परी मात्रा ४

तुझें आवडतें रुधिर हेंच खाद्य
तूंच असशी नर-हिंसकांत आद्य
जळू जेवीं शोषून रक्त घेई
तिच्याऐशी तव रक्त-पिपासा ही ५

१. काय = देह.

तुझ्या पाशामधिं गुंतल्या जिवाची
कधीं सुटका होणें न शक्य साची
ऊस जैसा घाण्यांत पिळवटून–
निघे, तैशी गतं टाकशी करून ६

दिसायाला तो भृंग नीच कीट
करी काष्ठाचें पोखरुनी पीठ
तुझी त्याच्याशीं तुल्यताच हो न
वज्र-देहाला करिसि मऊ मेण ७

दंड व्हावा अपराध करी त्यासी
विनाकारण तूं पीडितेस कैशी
किती लघु तूं असलीस तरी, पाहीं
तुझ्या भारानें जडचि जिणें होई ८

तुवां केलें स्वाधीन ज्या नरास
राज्य-वैभव हीं असुन वृथा त्यास
तुला वश जो होई न कदाकाळीं
तोच जगतीं या खचित भाग्यशाली ९

जीवनांतिल आनंद सर्व आटे
तुझ्या योगें नैराश्य मनीं दाटे
तुझा न घडो संबंध मजसि केव्हां
मनोभावें हें प्रार्थितसे देवा १०

सन १९३४

# ५२ धर्माचें तत्त्व

( छंद—अभंग )

विचारपूर्वक चालणारे थोडे
देशकालाकडे विलोकूनि १

रूढीचें महत्त्व बाळगिती फार
करिती आचार अन्धतेनें २

कालाचा प्रवाह वाहवीत नेई
ठरूं देत नाहीं एके ठायीं ३

पालटे आचार कालवशें किती
त्याच्याकडे दृष्टि कोण देतो ४

स्पर्शास्पर्शामधें आला सर्व धर्म
पाहीनाच मर्म त्याचें कोणी ५

पंथ-भेद आणि जाति-भेद नाना
धर्माची हेलना वाढवीती ६

धर्माची उदार शिकवण पाहा
समतेनें राहा यांत श्रेय ७

सन १९३४

## ५३ शान्ति-स्थान

( चाल—पडला अभिमन्यु० )

प्रपंचीं चिन्ता । चिन्ता किति असती
तयांची कोण करी गणती १

जातसे विलया । विलया एक, परी
ठाकते तोंच तिथें दुसरी २

ओहटी भरती । भरती अशि सतत
कधीं नच मन चिन्तारहित ३

स्वस्थता कुठली । कुठली ये चित्ता
जाळिती बहुविध ह्या चिन्ता ४

प्रपंचीं दुःख । दुःखचि भरपूर
त्यामधें चित्त सदा चूर ५

होतसे ताप । ताप विपत्तींचा
मिळेना लेशहि सौख्याचा ६

\+ \+ \+

शारदे माते । माते मी म्हणुनी
धांव घे दास तुझ्या चरणीं ७

तुझ्याविण कोठें । कोठेंही आन
दिसे नच शांतीचें स्थान ८

समाहित वृत्ती । सकल चित्त-वृत्ती
संगतीं तुझ्याच या होती ९

पडतसे विसर । विसर पूर्ण साचा
प्रपंचांतील उपाधींचा १०

मोकळा होई । होई स्वच्छन्द
तुटोनी सांसारिक बंध ११

करावी करुणा । करुणा मजवरती
प्रपंचीं तूं मम विश्रान्ती १२

जून १९३४

## ५४ ओझेवाला

( छंद—अभंग )

अंगें धष्टपुष्ट पाहतां चांगला
शक्तीनें आगळा दिसतोस १

चालायाचा मार्ग सोपा नि सुगम
प्रवासाचे श्रम नाहीं झाले २

परंतु भासशी शिणलेल्यापरी
कारण तें तरी काय वडे ३

प्रभातींची वेळा शीतल असतां
येई का म्लानता मुखावरी ४

संगें न्यावा ऐसा वाहायाचा भार
शिरीं खांद्यावर कांहीं नाहीं ५

भारावल्यासम मस्तक वांकलें
पडती पाउलें ढिलीं केवीं ६

\+ + +

पुरवलें मला अन्य ओझें शिरीं
काळजीचें भारी वाहवेना ७

सन १९३४

## ५५ वीर-वाणी

[ देशभक्तीकरतां तुरुंगांत देह-दंड भोगण्याचा प्रसंग बहुधा कोणत्याहि देशांतलि देश-भक्तावर येतो. त्याबद्दल तो देशभक्त कधींच खेद करीत नाहीं. त्याच्या आप्तेष्टांपैकीं कोणीं खेद प्रदर्शित केला तर त्याला त्याचें उत्तर काय असणार ? ]

( चाल—उद्धव )

सुखदुःख समानच चित्ता । कर्तव्य अनुष्ठित असतां ॥ धृ०

हा बंदिवास कष्टाचा । अज्ञानें तुजला वाटे
मम सुदैव फळलें म्हणुनी । प्राप्त हो भाग्य हें मोठें
पुण्याविण गत जन्मींच्या । हा प्रसंग मिळतो कोठें

या संकट केविं म्हणावें
ही कृपाच केली देवें
मनिं तदुपकार समजावे
मग वाहुं कासया चिन्ता । कर्तव्य अनुष्ठित असतां १

सुखदु:ख कल्पनेवरती । तें विशिष्ट ठायीं नाहीं
निज सदनामाजी अथवा । या ऐशा कारा-गेहीं
जड देह कुठेंही वागो । तत्त्वतां सारखें दोन्ही
त्यांतून वीर-वर-काया
समरांतचि योग्य पडाया
तिज कधीं न साजे शय्या
मग काय वावगें आतां । कर्तव्य अनुष्ठित असतां २

स्थिति हीन दीन देशाची । आजला किती ही होई
ही सुवर्णभूमी असुनी । दारिद्र्य भोगते पाहीं
पातली पुरी परवशता । सौख्याचें नांवहि नाहीं
हें सारें दिसत असूनी
कातडें ओढुनी नयनीं
स्वस्थ कां बसावें सदनीं
हें उचित नसे मज बघतां । कर्तव्य अनुष्ठित असतां ३

देशाच्या उद्धारार्थ । भोगणें देह-दंडातें
याहून तपस्या मोठी । पुण्यावह अन्य न दिसते
साफल्य यांत जन्माचें । सद्गतिला देइल मातें
विश्वास असा दृढ मजला
स्वीकारी सादर याला
आनंद खरोखर झाला
शोकाची कुठली वार्ता । कर्तव्य अनुष्ठित असतां ४

हा तुरुंग केवळ तनुला । मन अलिप्त याच्यापरतें
शृंखला जरी पायांत । अनिरुद्धचि मन संचरतें
मन बद्ध कराया नाहीं । सामर्थ्य राज-सत्तेतें
बाह्यतां दिसें मी कैदी
अंतरीं पुरा स्वच्छन्दी
नच विचार-सृष्टित बंदी
म्हणशिल तूं सत्यचि कथितां । कर्तव्य अनुष्ठित असतां ५

तूं सांग, चुकें मी काय । मागणें क्षमा ज्यासाठीं
देशावर प्रीती करणें । हा प्रमाद कुठल्या जगतीं
ठावें न काय तुजलागीं । रणभीरुस नरक-प्राप्ति
पर्वणीच ही सोन्याची
स्वर्गवास साधायाची
दवडावी वायां कैंची
आयती पुढें जर येतां । कर्तव्य अनुष्ठित असतां ६

निज कुलाच्याहि दृष्टीनें । यामधें न लाञ्छन कांहीं
होईल सुकीर्तिच लोकीं । तनु बचावुनी फल नाहीं
मरणाहुनि कीर्तिस भारी । संभावित जपतो पाहीं
देहास मरण ठरलेलें
वायांच किती जरि जपलें
चुकवितां न कोणा आलें
ये यशोदेह टिकवीतां । कर्तव्य अनुष्ठित असतां ७

मी कोण, कोणतें माझें । कर्तव्य नको का पाहूं ?
देशाचें होवो कांहीं । आपल्या सुखांतचि राहूं ?
अपमान गिळूं का सारा । स्वाभिमान सोडुन देऊं ?

गुण-धर्म लोपले जरि हे
मग काय मनुजता राहे
भू-भाराचि जगुनी आहे
प्रिय मृत्यु त्याहुनी येतां । कर्तव्य अनुष्ठित असतां ८

वनवास भोगणें लागे । पांडवां रामचंद्राही
नृप हरिश्चंद्र धर्मात्मा । आपदा कितीतरि साही
सत्त्व-धीर सकळांनीं त्या । सत्पथास त्यजिलें नाहीं
इतिहास-पुराणादींचा
तत्त्वज्ञ-कवी-साधूंचा
बोध हाच आहे साचा
कष्टावें देशाकरितां । कर्तव्य अनुष्ठित असतां ९

संगरीं वीर लढतांना । त्यावर हो बहु शर-वृष्टी
दूरस्थ जनांच्या तेव्हां । तो प्रसंग पडतां दृष्टी
आश्चर्यचकित करि भारी । भय उपजवि त्यांच्या पोटीं
पण वीरा त्याची कांहीं
क्षिति अंतरिं वाटत नाहीं
तो त्यांतचि रंगुन जाई
तैशाचि स्थिती मम आतां । कर्तव्य अनुष्ठित असतां १०

धैर्य या प्रसंगीं माझें । राहुं दे अढळ परमेशा
सामर्थ्य मला पुरवावें । साहण्यास काय-क्लेशा
ध्येय-च्युत चित्त न होवो । लोभुनी क्षुद्र सुख-लेशा

प्रार्थना करित मी ऐशी
प्रभु-पदीं तूंहि करिं तैशी
तो सत्याचा कैपक्षी
रक्षिलिचि अपुल्या भक्ता। कर्तव्य अनुष्ठित असतां ११

मूळ रचना १९२२
परिष्करण १९३४

## ५६ माझें गुणाचें बाळ

( चाल—परटा येशिल कधिं० )

सांगूं किति वर्णून। गुण मी। सांगूं किति० ॥ धृ०
बूड टिकेना घरांत केव्हां, भटके गांवांतून १
नीट परत का येइल, भांडण घेतलियावांचून २
सदा मुखाला हवा तोबरा ठेवाया बांधून ३
ना तरि घेउन हट्ट निलक्षण सोडिल भंडावून ४
घर डोक्यावर घेइल केव्हां ओरडून अरडून ५
रोज दुखापत नवी कुठें तरि अंगा घेच करून ६
गुण पोराचे संपायाचे नाहिंत हे सांगून ७
काय करूं तरि याच्यापुढती गेलें कंटाळून ८
पाळी आली जाण्याची गे आतां घर सोडून ९

सन १९३४

## ५७ एक विरोध

( जाति—**प्रणयप्रभा** )

सुखवी न कोणतें दृश्य मना
स्थिति तुळितां निज हो खेद दुणा ॥ धृ०

उषा उगवते अनुदिन उज्ज्वल
करी प्रकाशित सकळहि भूतल
अज्ञानाचा तिमिर अम्हांतिल
होई न परंतू लेश उणा १

पवन वाहतो जीवनदायी
अनिरुद्धपणें सर्वां ठायीं
परी आमुचा कोंडुनि राही
पर-दास्य-बंधनीं जीवपणा २

फुलें विकसती प्रातःकाळीं
प्रसन्नता पसरिति भवतालीं
दैन्य आमुच्या परी कपाळीं
बहु वाढतसे हें क्षण-क्षणा ३

द्विज-गण गाई कल-शब्दानें
उल्हासाचें सुरम्य गाणें
परंतु आम्हीं काय घोकणें
हा नित्य निराशा-वाद जुना ४

रात्र संपुनी दिवस येतसे
शिशिरामागुन वसन्त विलसे
चक्र-नेमिच्या क्रमापरि तसें—
आम्हांस मिळे कधिं भाग्य पुन्हा ५

सन १९३५

## ५८ न्याय

( चाल—अभंग )

कर्दमांत जन्म पावतें कमळ
म्हणून निर्मळ नव्हे काय १

मृग-नाभींतून निपजे कस्तुरी
म्हणून अव्हेरी कोण तिला २

हिरा कोळशाचा बन्धूच म्हटला
उभयांच्या मोला साम्य काय ३

भक्त कोणत्याही असो जातींतला
प्रिय तो देवाला सारखाच ४

जन्मावरी नाहीं उच्चनीचपणा
करा न्याय गुणावरोनि तो ५

सन १९३६

## ५९ संकटाचें स्वागत

( चाल—अभंग )

संकटाचें करीं स्वागत सादर
न घेईं माघार कदा काळीं १

उत्कर्षा साधक होतील संकटें
भिऊं नको नेटें झुंज त्यांसी २

कांट्यावीण कैसा गुलाब ये हाता
संकटें साहतां यशोलाभ ३

वन्हीनें सुवर्ण कसोटीला लागे
संकटाच्या योगें ध्येय-निष्ठा ४

येवोत आडवे किती गिरि-भाग
नदी काढी मार्ग तयांतूनि ५

महत्कार्य आहे साधायाचें तरी
वृत्ति तूं आदरीं सरितेची ६

सन १९३६

## ६० कवि-कल्पना

( वृत्त-- दिंडी )

करुन सोज्ज्वळ बहु हेममयी भूमी
तींत माणिक-मणि पेरियले नामी
पुढें त्यावरि पीयूष-वृष्टि झाली
आणि अंकुरलें बीज योग्य काळीं १

करी त्याची जपणूक बहु धनेश
तरू पावे तो वाढ दिसंदीस
येइ ईप्सित-फळ-भार मग तयाला
सुखी तेणें सुर-वृन्द सकल झाला २

कल्प-तरुची उत्पत्ति होय कैशी
कथा अद्‌भुत तरि आयकितो ऐशी
कवि-प्रतिभेची खचित दिव्य शक्ति
नवी निर्मितसे स्वर्गतुल्य सृष्टी ३

सन १९३६

## ६१ जीवन-सरिता

( चाल—अभंग )

केव्हां आणि कैसा हिचा जन्म झाला
याचा न लागला शोध कोणा १

वाहात ही आली किती भिन्न भिन्न
प्रदेश चालून येथवरी २

अमितचि युगें लोटलीं वाहतां
किती काळ आतां वाहणार ३

अखंड वाहते नाहींच विश्रान्ति
सागराची भेटी झाल्यावीण ४

निघाली त्या ठायीं पुन्हां पोचायाची
हीच शेवटची स्थिति आहे ५

देवा तूं सागर करुणा-निर्भर
जीवना-आधार सकळांच्या ६

अनन्य-गतिक जीवन-सरिता
तुझ्याशीं हो आतां एकरूप ७

सन १९३६

## ६२ करतूरी मृगास —

( जाति—**प्रणयप्रभा** )

हा सुगंध कोठुनि येइ तरी
कां धुंडिसि म्हणुनी वनान्तरीं ॥ धृ०

ज्या ज्या ठायीं जावें, तेथें
दरवळलेला तुजला वाटे
शोधावें पण केवीं कोठें
ती दिशाच चुकली खरोखरी १

जलीं देखितां अपुली छाया
दुजें कुणीसें भासे वाया
त्या अज्ञाना म्हणणें माया
पडलास संभ्रमीं तशापरी २

दृष्टि बहिर्मुख सोडुन देईं
शोध आपल्या ठायीं वेईं
तुझ्याचपाशीं वसतो पाहीं
जावयास नलगे कुठें दुरी ३

सन १९३७

## ६३ मागणें

( अभंग )

व्हावें कोणातरी मोठ्याचे संबंधी
हीच स्वर्ण-संधि लहानाला १

कोण विचारितो एर्‍हीं लहाना
तयाच्या जीवना मोल नसे २

शीर्णपर्णासम तयाची योग्यता
भोगावी अवस्था पाद-तलीं ३

सुवर्णाच्या संगें लाक्षा पावे माना
अलंकारपणा मिरविते ४

गौरवा चढवी कस्तूरी-संबंध
देऊन सुगंध मृत्तिकेला ५

कपटा असूनी कागदाचा खरा
पावे राज-मुद्रा-योगें मोल ६

तुझा पद-रज झालों तरी पुरे
मागणें दुसरें नाहीं देवा ७

सन १९३७

## ६४ भूतकाळ

जगतांत सर्वही वस्तू मरणाधीन
पण तूंच एकला चिरंजीव मृतिहीन १

ओहटी सागरा, चंद्राला क्षय असतो
हो कुबेर निर्धन, पर्वत झरुनी खचतो २

क्षय तुला कोठला वृद्धाचि अनुदिन होसी
तुज दिली अमरता परमेशानें ऐशी ३

× × ×

गुरु असाशि आमचा ज्ञान-वृद्ध तूं खचित
तव पदारविन्दीं नम्र असावें सतत ४

तुजपासुनि मिळतो बोध जनां हितकारी
तूं मार्ग दाविशी गोंधळतां अन्धारीं ५

तूं कितिक पाहिलीं साम्राज्यें, सम्राट्
इतिहास जगाचा खरा तुला विज्ञात ६

वर्तलें पाहिजे केव्हां कैसें पुढती
ती जाणुनि घेणें तुझ्याच कडुनी नीती ७

आधार आमुच्या एक भविष्याचा तूं
तव साह्य घेउनी साधूं मनिंचा हेतू ८

सन १९४०

## ६५ ओढ नसे उरली

( चाल—तूं माझा यजमान० यासारखी )

ओढ नसे उरली । जिवाला । ओढ नसे उरली ॥ ध्रु० ॥

जीवनांतली आशा-सरिता
आटुनियां गेली १

क्षुधाच उडतां पक्वान्नाला
गोडी मग कसली २

कशि वाजावी, श्रवण-मधुर ती
भंगलिया मुरली ३

हिमागमानें उपवन वठतां
शोभा मग कुठली ४

उत्साहाचें वारें लोपुनि
जडता ही भरली ५

प्रभो प्रार्थना काकुळतीची
ठाव देईं जवळी ६

सन १९४०

## ६६ कल्पतरु

(वृत्त—दिंडी)

सुफलदायी आहेत वृक्ष नाना
कल्पतरुला गणतात त्यांत राणा
आश्रिताचा पुरवील ईप्सितार्थ
कल्पवृक्षचि तो एकला समर्थ १

स्वर्गलोकाविण तो न अन्य कोठें
रूढ जन-मत हें सकल असे खोटें
खचित नांदे तो याच मनुज-लोकीं
तत्त्व-दृष्टीनें सुज्ञ त्या विलोकी २

पूर्वकालीं असणार कृत-युगांत
कलीमाजी दिसणार कसा मूर्त ?
पुराणींची मानून कथा साच
अज्ञ पडती भ्रान्तींत हे वृथाच ३

यत्न करतां नच साध्य काय लोकीं ?
धरूं मनिषा ती सकल पूर्ण हो कीं
यत्न-महिमा जाणून तत्स्तवार्थ
त्यास संबोधिति कल्पतरू सार्थ ४

सन १९४०

## ६७ मार्ग-दर्शनाचा प्रश्न

( एका पदवीधर तरुणानें "मी देश-कार्य काय करूं ?" असा प्रश्न लो. टिळकांस विचारला होता. त्या संबंधींच्या आख्यायिकेवर ही कविता आहे.)

( चाल--हे दीप लागले चोहींकडे ० )

मी काय करूं म्हणुनी पुढती ?
पडतसे चिन्तनीं अल्प-मती ॥ ध्रु० ॥

लतिकेवरची कलिका सुंदर
वसंत येतां होउन तत्पर
विकास पावूं लागे सत्वर
कधि पृच्छा नुपजे तिज चित्तीं १

सागराकडे धांवे सरिता
मार्ग तिला पण कोण दाविता ?
खडक आडवे कितिही येतां
ती लेश न त्यांची करी क्षिती २

मृगराजाचा छावा असला-
-तरि मारित तो मत्त गजाला
सहज-पराक्रम-गुण हा त्याला
शिकवाया लागे का जगतीं ? ३

इतर खगाला गरुड-मरारी
कशी मारितां येइल भारी
कार्य करावें त्यानें त्यापरि
ज्या जशी अन्तरीं हो स्फूर्ति ४

मूळ १९३३
परिष्करण १९४०

## ६८ वंचक

( छंद—अभंग )

नाहीं प्रेम-दया हृदयांत थोडी
पण किती गोडी वाणीमधें १

करी उपकृती ती ती स्वार्थमूळ
अन्तर निर्मळ आहे कोठें २

मोठेपण जगीं मिरवाया पाही
मन केलें नाहीं मोठें कधीं ३

नव्हे प्रामाणिक सत्याचा पुजारी
काय त्याच्या थोरी सभ्यतेची ४

जन हा वंचक पस्तावेल अन्तीं
आज चढो किती मान्यतेला ५

सन १९४१

## ६९ कविसम्राट् टागोर यांना सुमनांजली

( ताल—झपताला )

चरणिं तव वाहिला अश्रु-सुमनांजली
शोक-भारें अती हृदय ये दाटुनी १

पंच-भूतात्मिका त्यजिलि काया तुवां
पण यशः काय हा अमर हो त्रिभुवनीं २

मृत्यु-लोकांतुनी जाशि सुर-मंडला
पुण्य पुरुषोत्तमा धन्य तूं जन्मुनी ३

वंग-भूचा खरा पुत्र तूं शोभसी
गौरवीलें तिला आपल्या सद्गुणीं ४

भक्ति-सद्रसनिधी रचुनि गीतांजली
पावसी थोरली मान्यता बुध-जनीं ५

तूं तपोधन मुनी वाल्मिकीच्या परी
आयु निज वेंचिलें शारदोपासनीं ६

परिणत-प्रज्ञ तूं दिव्य प्रतिभा तुझी
लीलया विहरली काव्य-गुण-शालिनी ७

भाग्य मोठें तुझें वशचि तुज शारदा
लाडका तूं तिचा भक्त-गणिं अग्रणी ८

श्रेष्ठ निज संस्कृती, ब्रह्म-विद्या तशी
मान त्यांचा तुवां वाढवीला जनीं ९

दुःख, दारिद्र्य, हीं नाश पावावया
करिशि पथ-दर्शना मोह-तम वारुनी १०

शान्ति-संदेश दे काव्य-वाणी तुझी
निरत नित राहिली लोक-हित-चिन्तनीं ११

चरित आदर्शसें शील उज्ज्वल तुझें
गाउं किति थोरवी अतुल ती वर्णनीं १२

धीर गंभीरशी मूर्ति आतां तुझी
कोठुनी गोचरा स्फूर्ति-बल-दायिनी १३
तूं रवीन्द्रा कवे, वंद्य आम्हां सदा
पूजुं भावें तुला हृदय-पुटिं ठेवुनी १४

सन १९४१

## ७० उणीव

( चाल–सुरेख संगम किती० )

मदीय खुपते हृदीं । सदोदित । उणीव कांहीं तरी ॥ धृ०

सुस्थिती असे सर्वथा
पण मला होय ती वृथा
शान्तता मिळेना खरी । गमे मज । उणीव कांहीं तरी १

जल-निधी दिसतसे वरी
गंभीर केवढा, परी
वडवाग्नि जसा तदुदरीं । तशी ही । उणीव कांहीं तरी २

शशि शीतल आहे किती
त्या सुधांशु संबोधिती
क्षय तयास जडला परी । तशी मज । उणीव कांहीं तरी ३

पूर्णता कुठें कां नसे
सर्वत्र न्यूनता वसे
यामधें हेतु ईश्वरी । असावा । कळे न मज तो परी ४

हो जरी ध्येय-पूर्तता
मग नुरेच कर्तव्यता
ही उणीव म्हणुनी बरी । म्हणावी । अवश्य या भूवरी ५

सन १९४१

## ७१ विफल आकांक्षा

( वृत्त--दिंडी )

नसे अंगावरि वसन फाटकेंही
अर्धपोटीं राहून तनू वाही
अशा दीनासी बघुन दुःख होतें
दैन्य त्याचें पण ये न हरायातें १

दुष्ट कोणी गरिबास निरपराध
पीडितांना पाहून मनीं क्रोध–
येत भारी, पण काय करायाचें ?
नसे सत्ता-सामर्थ्य शासनाचें २

मोठमोठे येतात किति विचार
साध्य नसतां ते तापविती फार
पक्ष-हीनें नभिं उंच उडायाची
धरुनि आकांक्षा सफल होय कैंची ३

सन १९४१

## ७२ नम्रता धरावी

( चाल—प्रणयप्रभा )

जगिं पुरुष-यत्न हा श्रेष्ठ जरी
त्या साह्य ईश्वरी हवें, परी ॥ ध्रु० ॥

भूमी खणुनी सोज्ज्वळ केली
बीजहि आहे निकोप जवळी
परंतु पाउस पडला वेळीं—
पिकवील धान्य तर शेतकरी १

नौका सुंदर सुदृढ बांधिली
कुशल नाविका-हातीं दिधली
सिंधू क्षुब्धचि हा तर कसली
ती नेतां येइल पैलतिरीं २

पतंग उडवाया सजवीला
सूत्र बांधुनी नभीं सोडिला
पण तो जाइल उंच कोठला
अनुकूल नसेलचि वायु तरी ३

प्रभुत्व कितिही सृष्टीवरती
मिळवो मानव, आहे त्या मिति
गर्व वाहणें अनुचित चित्तीं
नम्रता धरावी तीच बरी ४

सन १९४१

## ७३ जिज्ञासेचें कौतुक*

( चाल—तूं माझा यजमान० )

प्रश्नांचा भडिमार । करिशी । प्रश्नांचा भडिमार ।। ध्रु० ।।
तुजसि उत्तरें देतां देतां होई मी बेजार १
तुझी वाढती जिज्ञासा ही, तिला न आदि न पार २
समाधान तव केविं करावें, न कळे मज साचार ३
स्वभाव तव हा वाटे मजला शंकेखोरचि फार ४
प्रश्न कठिण किति चतुराईचे, खावी लागे हार ५
कोप न ये कधि या प्रश्नांना परिसुनि वारंवार ६
कुतुक कराया तव बुद्धीचें होतें हृदय उदार ७
तोषचि देई मनास माझ्या, तव हा प्रश्न-विचार ८

सन १९४१

* लहान मुलें आईबापांस नाना प्रकारचे प्रश्न विचारून कशी भंडावून सोडतात हें सर्वांच्या परिचयाचेंच आहे.

## ७४ दीपावली साजिरी

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

नीति-न्याय नुरे रणाग्नि भडके लोभामुळें दारुण
शास्त्रांची प्रगती घडूनिहि वृथा नाशास हो कारण
शान्तीचा पथ शोधिल्याविण अतां थांबेल ना दुर्गति
पाळूं मानव-धर्म सर्व तरि हो दीपावली सार्थ ती

\+ \+ \+

येवो दुस्तर संकटार्णव पथीं, त्यांतून धैर्यें तरूं
कार्याचा भर पर्वतोपम पडो, वाहूं, क्षिती ना करूं
हें वीर-व्रत आचरूं दृढ मनें उद्दिष्ट साधूं तरी
भाग्याला उजळूं तदाच अपुली दीपावली साजिरी

\+ + +

जेथें सद्‌गुण नांदती वसतसे लक्ष्मी तिथें सन्तत
होई सद्‌गुणहीन मानव तरी सोडून दे त्याप्रत
राहे ती पुरुषोत्तमा वश सदा, त्याच्या पदीं निश्चला
जोडूं सद्‌गुण-संपदा तर्धि खरी दीपावली सोज्ज्वला

सन १९४१

## ७५ आत्मसमर्पण

( छंद—अभंग )

सर्व दुःखासी कारण
प्रभो तुझें विस्मरण १

झाली दृष्टि बहिर्मुख
तुझी लोपली ओळख २

तुझ्या माझ्यांत अभेद
परी भासे विसंवाद ३

अहंकार लया जातां
द्वैत नुरेचि वस्तुतां ४

जीव शिव एकरूप
शुद्ध आनंदस्वरूप ५

दृढावतां तुझी भाक्ति
आहे जवळीच मुक्ती ६

तुझ्या पदीं होई लीन
केलें आत्मसमर्पण ७

मूळ १९३३
परिष्करण १९४२

( श्लोक )

सोडी गुंगवुनी जनां सकाळिकां वेणू व्रजाभीतरीं
तीमध्यें गुण कोणता पण असा होता म्हणावा तरी
हें सामर्थ्य तिचें नसे, वदविता झाला तिला श्रीहरी
माझी ही कृति वाङ्मयात्मक तशी, त्याची कृपा हो खरी !

इति शम्

# परिशिष्ट १ लें

४ दिवंगत मित्रासः— म्हणजे माझे बालमित्र रघुनाथ कोल्हटकर यांस उद्देशून ही कविता झालेली आहे.

८ संकल्पसिद्धिः— या कवितेच्या भूमिकेविषयीं थोडी स्पष्टता करण्याच्या दृष्टीनें उल्लेख करावासा वाटतो कीं, श्रीअंबाबाई तालीम संस्थेशीं माझा संबंध विशेष जिव्हाळ्याचा आहे. संस्थेचा कार्यवाह म्हणून मी पूर्वी अनेक वर्षें काम केलें आहे व संस्थेवरील प्रेमच या कवितेस कारणीभूत आहे.

३१ लोकापवादः— माझ्या कांहीं मतांबाबत व आचरणाबाबत एक-दोघां मित्रांनीं विनाकारण मला दोष दिला. वास्तविक मी शुद्ध होतों. परंतु वस्तुस्थिति त्या मित्रांना कशी पटवावयाची असा प्रश्न पडला. त्या मनःस्थितीवरून कविता करण्याची स्फूर्ति झाली. शुद्धाचरणी विधवेवर असा प्रसंग येत असेल या कल्पनेचा आधार घेऊन मग त्या भूमिकेवरून कवितेला हें स्वरूप दिलें आहे.

४० वेडः— परमेश्वर-भक्तीचें वेड लागावें अशी शेवटीं प्रार्थना केली आहे खरी. परंतु प्रथम कविता लिहिली ती देशभक्तीचें वेड लागावें अशा अपेक्षेनेंच केली होती आणि चार व पांच हीं कडवीं त्याच अर्थाचीं द्योतक रचलीं होतीं. तीं कडवी खालीं नमूद करून ठेवीत आहें.

परंतु थोडे
असले वेडे
मायभूमि तव पायीं
अर्पियलें मन ज्यांहीं ॥४॥

वेड तुझें पण
खचितचि भूषण
तुझिया भक्तां होई
लागावें तें मजही ॥५॥

ज्ञानप्रकाशमध्यें ता. २६ मे १९३९ रोजीं ही कविता प्रसिद्ध झाली त्या वेळीं वरील कडवींच आहेत.

५५ वीर – वाणीः— देशभक्त पूज्य श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं तुरुंगांतून श्रीयुत पुंडलीकजी यांना पाठविलेलीं पत्रें माझ्या वाचनांत आलीं. तीं पत्रें वाचल्यानें माझ्या मनांत खळबळ उठली व त्यांतील विचार गुण-गुणावे असें वाटूं लागलें. त्या भूमिकेशीं समरस झालेल्या मनःस्थितींत ही कविता केली आहे. तुरुंगाचा अनुभव मला नाहीं हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

६० कविकल्पनाः— यांतील भावार्थाचा मजकूर केसरींत किंवा अन्य वर्तमानपत्रांत कोठेंतरी वाचलेला स्मरणांत तरळत होता. त्याआधारें ही कविता निर्माण झाली आहे.

## इतर खुलासा

१ यांतील कांहीं थोड्या कविता 'अनुवादक' वगैरे निराळ्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या आहेत. संशयास जागा राहूं नये म्हणून मुद्दाम ही गोष्ट स्पष्ट करून ठेविली आहे.

२ प्रत्येक कवितेखालीं तिचा रचना-काल दिला आहे तो बहुतेक बरोबर आहे. टिप्पणवहीवरून ज्यांचा रचना-काल निश्चित समजला नाहीं त्यांचा अंदाजानें दिला आहे.

३ कवितांचें परिष्करण करण्याचा प्रयत्न अनेक वेळां केला आहे. व तो उपयुक्त ठरला आहे.

## छंदोविषयक खुलासा

१ दिंडी पद्यांत नऊ मात्रेनंतर 'उमा' (लघुगुरु) गण आला तर म्हणण्यास अडचणीचें होतें असें मीं 'पद्यमीमांसे'तील लेखांत माझें मत प्रदर्शित केलें आहे. ती अडचण लक्षांत घेऊन सदर ठिकाणीं 'उमा' गण न येईल अशी शब्दयोजना यांत आलेल्या सर्व दिंडी पद्यांमध्यें केली आहे.

२ चरणाच्या शेवटच्या अक्षरावर अधिक मात्रा भरून काढावयाच्या असतील तर शेवटीं गुरु अक्षर पाहिजे. अकारान्त अक्षर असणें गेयतेच्या दृष्टीनें सोयीचें व इष्ट होत नाहीं असें मला वाटतें कारण अधिक मात्रा भरून काढण्याकरतां चरणान्तींचा 'अ'कार लांबवून दीर्घतर उच्चारला असतां तो उच्चार कर्णकटु लागतो. तथापि ज्यांचें अन्त्य अक्षर अकारान्त आहे असे कित्येक चरण (गेयतेच्या दृष्टीनें सदोष चरण) या संग्रहांतील दिंडी वगैरे कांहीं पद्यांत आहेतच ही गोष्ट मीं जाणतों. या बाबतींत अखेरचा व पुरा निर्णय मीं केलेला नसल्यामुळें मी स्वतः होऊन वरील दोष वाचकांच्या नजरेस आणून देत आहें. हेतु इतकाच कीं, या गोष्टीचा विशेष विचार छंदःशास्त्रज्ञांकडून व्हावा.[1]

३ आणखी एक मतभिन्नता स्पष्ट करून ठेवावयास पाहिजे. ती ही कीं, अभंगादि छंदातील प्रत्येक अक्षराचा द्विमात्रिक उच्चार करावयाचा असें जें कित्येकांचें सिद्धान्तात्मक म्हणणें आहे तें मला मान्य नाहीं. साध्या चालीवर अथवा गेय चालीवर अभंग म्हटलेले ऐकले तर वरील सिद्धान्ताप्रमाणें अनुभवास येत नाहीं. पण हा वादाचा विषय असल्यानें माझें मत नमूद करण्यापेक्षां अधिक लिहिण्याचें येथें कारण नाहीं.

---

## परिशिष्ट २ रें

### भाषान्तरित श्लोक

१ (वृत्त- शार्दूलविक्रीडित)

जे कोणी अवहेलना पसरती चोहोंकडे मंदधी
केला यत्न नसे परंतु अमुचा त्यांकारणें हा कधीं
कोणीही उपजेल निश्चित असा, मत्साम्यधर्मा पुढें
आहे काळ अनंत, विश्वहि पहा विस्तीर्ण हें केवढें !

---

१. यासंबंधीं माझा लेख 'साधना' मासिक (सातारा) जून सन १९४३ च्या अंकामध्यें प्रसिद्ध झालेला आहे. तो जरूर तर पहावा.

२ (वृत्त– वियोगिनी)

सहसा न करी क्रिया कदा
विपदेला अविवेक कारण
सुविचार - रतास संपदा
वरिते ती गुण - लुब्ध होउन

३ (वृत्त– मालिनी)

अजर, अमर, ऐसें जाणुनी जीवितास
अनवरत करावें द्रव्यविद्यार्जनास
कळत न कधिं मृत्यू आपणा ग्रासतो कीं
म्हणवुनि अविलंबें आचरीं धर्म लोकीं

४ (वृत्त– सदर)

कधिं तरि उदया ये पश्चिमेलाहि भानू
वरिल अनल शैत्या, तो चळे रत्न-सानू
कमळ विकसलेलें प्रस्तरीं आढळेल
पण कधिं सुजनोक्ती अन्यथा ना घडेल

५ (वृत्त– अनुष्टुप्)

मानी विद्या विवादार्थ । द्रव्यानें मत्त हो खल
परासी द्यावया पीडा । वेंचि तो आपलें बल

६ (वृत्त– सदर)

विद्येनें ज्ञान संपादी । दानासी वितरी धन
स्वसामर्थ्यें करी साधू । दीनांचें परिपालन

---

पद्यकार, छंदःशास्त्राचे अभ्यासक व महाविद्यालयीन विद्यार्थी
या सर्वांस उपयुक्त पुस्तक

# पद्य-मीमांसा

( छंदोविषयक लेखांचा संग्रह )

लेखकः—**वि. ज. सहस्रबुद्धे**, मिरज

प्रस्तावनाकारः—प्रो. **श्रीनिवास नारायण बनहट्टी**, नागपूर

## नियतकालिकांचे निवडक अभिप्राय

“ मराठी छंदःशास्त्रांत या पुस्तकाला महत्त्वाचें स्थान मिळेल यांत शंका नाहीं.”

—मनोहर, नोव्हेंबर १९४१

“ या ग्रंथानें छंदोरचनेवर नवीन प्रकाश पाडला आहे.”

—अग्रणी, ता. ६ आक्टोबर १९४१

“ श्री. सहस्रबुद्धे यांच्या लेखांवरून त्यांचा अभ्यासूपणा, तर्कशुद्ध विचारसरणी, शास्त्रीय दृष्टि, पूर्वलेखकांच्या ग्रंथांचें सादर व सहृदयतेनें परिशीलन, हे गुण त्यांच्या ठिकाणीं असल्याचें दिसून येतें.”

—लोकशक्ति, ता. २४ नोव्हेंबर १९४१

“ रा. सहस्रबुद्धे यांनीं आपल्या या लेख-संग्रहांत छन्दोरचनेनंतर झालेल्या छंदःशास्त्रावरील सर्व चर्चांचा परामर्श घेतल्यानें त्यांच्या पुस्तकास अद्यावत् स्वरूप प्राप्त झालें आहे.”

—झंकार, ता. १ मार्च १९४२

" श्री. सहस्रबुद्धे यांनीं या लेखांतून जे विचार पुढें मांडले आहेत ते सर्वस्वीं विचारार्हच आहेत. भजन पद्धतींत सुधारणा करण्याविषयींच्या सूचना कोणालाहि योग्यच वाटतील. तात्त्विक चर्चेच्या दृष्टीनें ' मात्रा-गण-विचार ' हा लेख सर्वांत महत्त्वाचा ठरेल."

—महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, आक्टोबर १९४१

" छंदःशास्त्र हा विषयच किचकट व डोकेफोड करणारा आहे. ××× त्यावर चर्चा करून सत्यान्वेषण व छंदःशास्त्राचा विकास करण्यासाठीं अधिकारी लेखकानीं व विचारवन्तांनीं परिश्रम घेणें जरूर असतें. श्री. सहस्रबुद्धे यांनीं याच हेतूनें हा विषय हातीं घेतला व त्याचा व्यासंग करून निरनिराळ्या लेखांतून आपले विचार व्यक्त केले आहेत. हे लेख अभ्यासकांना विचार करावयास लावतील यांत शंका नाहीं.

—महाराष्ट्र, ता. १५ मार्च १९४२

सदरहू पुस्तकाच्या प्रती संपत आल्या आहेत. ग्राहकांनीं त्वरित मागणी करावी.

प्रकाशकः—गोविंद वामन कुलकर्णी

महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर

---